# HISTORY OF THE HOUSE OF SCINDIA

BY

SHUNKER TATYA FUDKAY.

---

# शिंद्यांचे घराण्याचा इतिहास,

शंकर तात्या फडके यांणीं केला

तो

मुंबईंत :

“ इंदुप्रकाश ” छापखान्यांत छापिला.

---

सन १८६४ इसवी.

# प्रस्तावना.

हल्लींच्या काळांत कित्येक देशांचे व राज्यांचे इतिहास प्रसिद्ध झाले आहेत. त्या प्रमाणे मराठी राज्यांपैकीं अवशेष मुख्य शिंद्यांचें घराणें याचाही इतिहास असावा या हेतूनें तो, मी लिहिण्याचें योजिलें. परंतु या कामास जितकी माहिती व दाखले मिळावयाचे तितके अवश्य असून प्राप्त झाले नाहींत. तत्रापि कांहीं मिळाले ते व मराठी आणि इंग्रजी पुस्तकांतून या घराण्याची फुटकळ माहिती, या शिवाय आलीकडील गोष्टींचे स्वतांचे स्मरण यांचे आधारानें पुढील इतिहास संक्षेपानें लिहिला आहे. हा पूर्णपणें कथिला गेला असें नाहीं. आश्रय व दाखले मिळण्यास, मदत मिळाल्यास, पुढें जो मोठा इतिहास होऊं सकेल त्याचा हा आराखडा आहे असें समजलें पाहिजे. यास्तव यांत जे दोष आढळतील ते मला कळविले असतां मी मोठा आभारी होईन. हल्लींच्या श्रमापासून शिंद्याचे राज्यांतील लोकांस व इतर लोकांस कांहीं उपयोग झाला ह्मणजे श्रम परिहार झाले.

त्यानंतर राणोजीराव याणें सन इसवी १७२४ चे सुमारास बऱ्हाणपूरचा सुभेदार व माळव्यांतून आलेले कित्येक मोंगलाचे सरदार यांशीं कांहीं लढाया केल्या, त्यांपैकीं एके लढाईंत राणोजीराव आपल्या स्वारांच्या टोळीसहवर्तमान पुढें सरून मोठ्या शौर्यानें लढला, आणि प्रतिष्ठा पावला. या पुढें तो इतका वाढला कीं, सन १७४३ त अहमदशाह बादशाह यास मराठ्यांनीं आपला धनी नीटपणें वर्तेल म्हणून एक पत्र लिहून दिलें होतें त्यांत त्याचें नांव पहिलें होतें.

३. या समयीं माळवा व हिंदुस्थान येथें ज्या लढाईंत राणोजीराव असे त्या सर्व पेशव्यांचे नांवानें होत असत, आणि याज बरोबर आणखी मराठे सरदार असत, यामुळें जय अथवा अपजय होणें तो पेशव्यांचे नांवानें सर्व सरदारांनीं समाईक पणें केला असें होई. यास्तव त्यांत राणोजी रावाचीं कृत्यें कोणतीं त्यांची फोड करण्या जोगतां दाखले आढळत नाहींत. परंतु इतकें मात्र खरें कीं, मराठी मंडळांत उत्तरेकडे स्वाऱ्या घालणाऱ्या सरदारांत हा पहिल्या पदवीचा मानकरी होता असें आढळतें.

४ राणोजीराव शिंदा याजला फौजेच्या खर्चाकडे विशेष मुलूख लाऊन दिलेला नव्हता. याजला पेशव्यां कडून नगदी पैसा मिळे तेणें करून अगर मुलुखांतून खंडण्या घेत त्यांतील ऐवजांतून फौजेचा खर्च भागविण्याची चाल असे. तथापि उत्पन्ना पेक्षां खर्च जास्ती झाल्या मुळें याचा परम स्नेही मल्हारराव होळकर याचें याला बहुत ऋण आलें.

५ राणोजीराव शिंदा सन इसवी १७४४ सांत वारला, तेव्हां त्याला माळव्यांमध्यें एका लहान गावांत जाळलें, तेव्हां पासून त्या गांवास राणागंज असें नांव पडलें.

६ राणोजीराव शिंदा चपळ उलाढाली करणारा शिपाई होता. याचें लग्न दक्षिणेंत मैना या नांवाचे स्वजातीचे कन्येशीं झालें, तिजपासून याला जैयापा, दत्ताजी, आणि ज्योतिबा असे तीन पुत्र झाले, व यां शिवाय रजपूत जातीचे राखेपासून याला तुकोजी व महादजी असे दोन दासीपुत्र झाले. त्यांतून तुकोजी तर राणोजीराव जिवंत असतांच वारला होता.

## भाग २

१ राणोजीराव शिंदा वारल्यावर त्याचे तीन औरस पुत्रां पैकीं वडील जयापा-याजकडे पेशव्यांनीं त्याच्या बापाच्या फौजेची सरदारी सांगितली, आणि हा व याचे दुसरे बंधू यांजला पेशवे हिंदुस्थानांत व माळव्यांत स्वारी बरोबर लढण्यास आणूं लागले.

२ याजकडे सरदारी झाल्यावर याणें आपल्या बापाचे वेळचा दिवाण रामचंद्र बाबा शेणवी नामें होता, त्याजला कामांतून काढण्याचा प्रयत्न केला. तो प्रकार असा—बाजीराव पेशव्याचे कारकिर्दींत वर सांगितलेल्या नांवाचा गृहस्थ वाडी प्रांतांतून येऊन साताऱ्यास राहिला होता. तेथें तो कारकुनी व शिपायगिरीचे कामांत निपुण झाल्या मुळें बाजीरावानें त्यास राणोजीराव शिंद्याची दिवाणगिरी सांगितली होती. ती दिवाणगिरी तो करीत असतां, जयापा व हा यांमध्यें पटेनासें झालें. आणि तसेंच कांहीं राजकीय कारणाचे निमित्तानें मल्हारराव होळकराशीं ही याचें वितुष्ट पडलें. परंतु तो सूड उगविण्यास राणोजीराव असतां कांहीं चाललें नाहीं. परंतु तो वारतांच सरदारीचें काम जयापाकडे झाल्यावर त्याणें मल्हारराव होळकराचे सहायानें त्यादिवाणास, पेशव्यांचा पुतण्या सदाशिवराव भाऊ सहाय असतां ही, बाळाजी बल्लाळ पेशवा यांस आपल्या दिवाण गिरींतून काढण्याचें अगत्य पाडलें.

३ हिंदुस्थानांत व माळव्यांत ज्या लढाया होत व खंडण्या वसूल करण्याचें जें काम असे, त्यांत हें शिंदेमंडळ असे. आणि या प्रमाणें सन १७५२ च्या सुमारास दिल्लीस अहंमदशाह बादशाहचे कारकिर्दींत सफदर जंग नामें वजीर होता, तो रोहिलेलोकांशीं दुसरे लढाईत पराभव पावल्यावर त्यांजला पुनः जिंकण्या करितां आणखी मराठे सरदारां बरोबर जयापा शिंद्यासही त्याणें आपले कुमकेस बोलाविलें, आणि याणें जो त्याजला मदत दिली त्याबद्दल त्याणें याला रोहिल खं-

डाचा कांहीं भाग दिला. परंतु कांहीं कारणां वरून त्याबद्दल नगदी पैसा द्यावा असा ठराव झाला, आणि इतक्याच संधीस सलाबत जंगाशीं लढण्या करितां पेशव्यां कडून बोलावणं आलें, यामुळें ते परत दक्षिणेंत आले.

४ सन १७५६ चे सालीं पेशव्याचा भाऊ रघुनाथराव याणें हिंदुस्थानांत स्वारी करून अटक नदी पर्यंत मुलूख आपले अमलांत आणिला; तेव्हां सर्व शिंदे मंडळ बरोबर नेलें होतें. त्यांतून जयापा व दत्ताजी हे मोठ्या बलाढ्य सेनेचे सरदार असत. यांज पैकीं जयापा यास त्याणें मारवाडचे मोहिमे वर नेमलें. तो प्रकार असा कीं, जोतपुरचा राजा अभीप शिंग मेला, तेव्हां त्याचे दोघे पुत्र रामशिंग व विजेशिंग हे तक्ता करितां भांडूं लागले, त्यासमयीं रामशिंगानें पेशवा सहाय करून घेऊन जयापाला त्याच्या लश्करा सहवर्तमान आपल्या कुमकेस मागून नेलें, आणि जयापानें तें आपणास सोंपलेलें काम सिद्धीस नेण्या करितां नागोर किल्ला, ज्यांत विजे शिंग राहत होता, त्यास वेढा घातला. तेव्हां त्याणें आपले भावास मारेकरी घालून मारिलें, आणि जयापासही मारण्याची तजवीज केली. ती अशी कीं, नागपूर या नांवाचे गांवाजवळ असतां दोन राठोर रजपूत, तहाच्या बोलण्याचे निमित्तानें वकीलाच्या वेषानें याजकडे पाठविले, आणि त्यांणीं याजला एकांत करीत असतां पोटांत शस्त्र मारून पाडिलें, आणि तेणे करून जयापाचा अंतकाळ झाला. यापुढें जयापाचें लश्कर मागें हटलें, परंतु रघुनाथरावानें पुढें अजमीर घेऊन जोतपूरची खंडणी ठरविली. त्यापैकीं कांहीं गांव पुष्करास जयापाची छत्री आहे त्याचे खर्चाकडे लाऊन दिले.

५ त्याच सुमारास म्हणजे सन १७५९ चे सालीं रघुनाथराव दक्षिणेंत परत आला, तेव्हां माळवा व त्याणें घेतलेला हिंदुस्थानचा प्रदेश याचे बंदोबस्ता करितां जयापाचा भाऊ दत्ताजी याला त्याचे बंधू जोतीबा व महादजी हे बरोबर देऊन मागें ठेविलें होतें, त्यांजला शाबुदीन याणें रोहिले जिंकावयास योजिलें. परंतु तें काम पुरें झालें नाहीं इतक्यांत दत्ताजीनें असें वर्तमान ऐकिलें कीं अहमदशाह बादशाहा मोठें सैन्य घेऊन लाहोरावर चढाई करण्यास येत आहे. हें वर्तमान ऐकतांच त्याणें रोहिल्यांशीं तह करून आपली फौज घेऊन लाहोरच्या

मराठ्यांचे कुमकेस निघाला. परंतु हा लाहोरास पोंचण्या पूर्वींच अहमदशाह अबदालीनें तेथील मराठ्यांचा पराभव करून त्यांच्या पाठीमागें एक टोळी लाविली. इतक्यांत त्या मराठ्यांचे कुमकेस दत्ताजीचें ही लश्कर पोंचलें. परंतु मुसलमानी लश्कर त्यासमयीं बहूत व बलाढ्य असल्या मुळें दत्ताजी मागें हटत हटत दिल्लीकडे चालला. तरी अहंमद शाहानें पाठलाग सोडिला नाहीं. शेवटीं मराठी लश्कर यमुनेचे पश्चिम कांठानें चाललें असतां, त्या वेळीं दिल्ली नजीक रडर येथें त्याणें पूर्व कांठा वरून यमुना उतरून मराठ्यांवर एकाएकीं हल्ला केला, आणि या समयीं मराठी फौजेची नजर शत्रूंच्या बिनीवाल्यांवर होती या मुळें ते गाफील होते. यासमयीं मराठी लश्कराची दाणादाण झाली सबब त्याची पुन: जमाजम करून मोठ्या शौर्यानें लढत असतां, दत्ताजी व त्याचा भाऊ जोतीबा हे दोघेही या लढाईत पडले.

६ याप्रमाणें राणोजीराव शिंद्याचे तिघेही पुत्र मारले गेल्यावर वडील पुत्र जयापा यास मरते समयीं एकपुत्र जनकोजीनामें होता, त्याजकडे सरदारी होऊन तो सदाशिव राव भाऊ यांजबरोबर हिंदुस्थानांत गेला; परंतु थोडका काळ गेला नाहीं इतक्यांत सोनपत पानपत येथें मराठ्यांची विख्यात लढाई तारिख ६ जानेवारी सन १७६१ त झाली, तींत याणें उजवी बाजू रक्षणकेली होती, परंतु त्यादिवशीं मराठ्यांचा मोड होऊन जनकोजी शिंदा जखमी झालेला अफगाण लोकांचे हातीं लागला, आणि त्यांणीं त्याजला मोठ्या क्रूरतेनें व निर्दयपणानें मारलें.

७ इतकें झाल्यावर शिंद्याचे घराण्यांत कोणी सरळ वारस सरदारी करण्यास नाहींसा झाला, आणि राणोजी रावाचे पुत्रांपैकीं महादजी नामें एक दासीपुत्र मात्र राहिला.

---

## भाग ३.

---

१ जनकोजी शिंद्याची पूर्व भागांत सांगितल्याप्रमाणें समाप्ति झाल्यावर महादजी नावाचे दासी पुत्राखेरीज या घराण्यांतील सरदारी चालविण्यास जवळचा वारस राहिला नाहीं. आणि यापूर्वी पानपतच्या वगैरे लढाईंत महादजी हा शिंद्याच्या बऱ्याच मोठ्या फौजेचा सरदार असे, याशिवाय शूर व शहणा असे. आणि त्यासमयीं शिंद्याचे विसकळीत झालेल्या फौजेंतील लोक आपणांस आवरण्यास कोणीतरी धनी पाहिजे, असें इछीत होते. यास्तव महादजी शिंद्यास उपजत वारसा नसतांही या घराण्यांतील पुढारी होण्यास अटकाव झाला नाहीं.

२ महादजी शिंदा पानपत येथील मराठ्यांचे लढाईंत होता, आणि त्यादिवशीं मराठ्यांचा रणांगणांत मोड झाल्यावर हा तेथून आपल्या दक्षिणी घोडीवरून मागें जात असतां, याचा एका अफगाण स्वारानें बहूत दूरपर्यंत पाठलाग केला, त्यासमयीं याचे घोडीनें त्या शत्रूस मागें टाकिलें, परंतु अमळ विसावा घेण्यास थांबतांच शत्रू पूर्ववत पाठीमागें दिसला, आणि अशा प्रसंगीं याची थकलेली घोडी पळत असतां, एका खळग्यांत अडखळून पडली; यामुळें त्याणें याला आटोपिलें. आणि जेरजेरकरून गुडघ्यावर येक फरशीचा घाव असा दिला कीं, तेणेंकरून हा जन्मवर लंगडा राहिला. त्या शत्रूनें याला जखमी मात्र केलें आणि घोडी व अलंकार हिराऊन घेऊन सोडून दिलें. त्यानंतर हा राणेखान नांवाचे मराठी फौजे बरोबरचे भिस्त्यास आढळला, तेव्हां त्याणें याला आपले बैलावर घालून दक्षिणेंत नेलें. हे उपकार स्मरून पुढें त्याला महादजी याणें आपला सरदार करून त्याची मोटी संस्थाही करून दिली. ही पाठलागाची गोष्ट महादजी शिंदा लोकांस वारंवार सांगत असे. आणि त्या गोष्टीचा त्याच्या मनावर इतका ठसा बसला होता कीं, पुढें बहूत काळ पर्यंत तो पाठलाग करणारा अफगाण व त्याची दक्षिणी घोडी हीं नेहमी त्याला स्वप्नामध्यें दिसत असत.

३ पानपतचे लढाईंत मराठ्यांस मोठा धक्का बसला, आणि कांहीं काल पर्यंत नर्मदेच्या उत्तरेस त्यांची सत्ता अगदीं नाहींशी झाली होती. व त्याबरोबरच शिंद्यास फौजेच्या खर्चास लाऊन दिलेलीं संस्थानें व खंडण्या गेल्या; परंतु महादजी शिंदा बाळाजी बाजीराव पेशवा याचे खासगी पागेंतील वजनदार सरदार होता, सबब त्याणें आपलीं गेलेलीं संस्थानें पुनः घेण्यास व इतर राजां पासून खंडण्या वसूल करण्यास कांहीं खासगत फौज ठेविली, आणि तिच्या बळानें आपण स्वतांच आपलीं पूर्वींचीं संस्थानें घेऊन खंडण्या वसूल करण्याचें काम करूं लागला. सन १७६४ त मल्हारराव होळकर वारल्यामुळें नर्मदेच्या उत्तरेस येणाऱ्या मराठा सरदारांचें प्रमुखत्व याजकडे येऊन हा आपणांस पेशव्यांपासून स्वतंत्रताकरून घेण्याची इच्छाकरूं लागला. यानंतर हा बहुतकरून उज्जनीस राहूं लागला, आणि तेथून मध्यहिंदुस्थानांतील व आसपासचे मुलखांतील राजांपासून खंडणी घेऊन पेशव्यांचे नांवानें आपले खालसा मुलखास मिळेल तसतसा येकयेक परगणा जोडता झाला, आणि याप्रमाणें त्याणें आपलें राज्य स्वतंत्र स्थापण्यास आरंभकेला.

४ परंतु त्याचा हा बेत सिद्धीस जाण्यास मध्यें कांहींसें विघ्न झालें तें असें कीं, पानपतची लढाई झाल्यावर पेशव्यानें सुमारें आठवर्षेंपर्यंत हिंदुस्थानांतील कामांत स्वतां मनघातलें नवतें. परंतु सन १७६९ चे अखेरीस विसाजीकृष्ण बिनीवाला याजबरोबर मोटें सैन्य देऊन त्याजला हिंदुस्थानांत पाठविलें, आणि त्याचे विचारें सर्व मराठी सरदारांनीं चालावें असें सांगितलें. तेव्हां महादजी सिंदा आपणांस पेशव्याचे घरचा शिपाई म्हणवीत होता, यामुळें त्याजला अंतर्यामीं नसलें तरी बाह्यातकारीं कांहीं त्याचे मसलतीनें आपण चालतों असें दाखविणें प्राप्त झालें. तथापि हा त्याचे विचारें वागला नाहीं, असें म्हणण्यास प्रमाणें आहेत. यासमयीं महादजी शिंद्याचें मत पडलें कीं, या प्रसंगीं दक्षिणेतून पन्नास हजारस्वार व मोटें पायदळ याशिवाय मोटा तोफखाना आहे तो आणून मोंगलांचा सूड उगवावा. परंतु मुसलमान लोकांचा त्यावेळीं मुख्य सरदार नजीब उदवला मराठ्यांशीं तहकरण्यास सिद्ध होता, सबबतसें केलें असतां उगीच

द्वेषबुद्धी वाढेल म्हणून विसाजी कृष्णतसें करण्यास अनुमोदन देईना, यास्तव ही पंचाईत शेवटीं पेशव्या पर्यंत गेली; तेव्हां त्याणें लिहून पाटविलें कीं शाहअलम बादशाहतूर्त इंग्रजाचे आश्रयास आहे तो आपले स्वाधीन होईपर्यंत रोहिल्यांशीं लढाई आरंभूनये. त्यानंतर मोंगल वमराठे यांचा तहठरला, परंतु नजीव अदबला लौकरच वारल्यामुळें महादजी शिंद्यानें ती संधी साधून सर्व रोहिल्यांस जिंकलें. आणि इंग्रजांकडे आपणस्वतां जाऊन बादशाहास आणून सन १७७१त त्याजला दिल्लीच्या तक्तावर बसविलें. त्यानंतर या कृत्याबदल बादशाहानें मराठी लोकांस देणग्यादेऊं केल्या होत्या, त्यांत कमी जास्तीबद्दल कांहीं तकरारी निघून मराठे लोक अतृप्त असें बादशाहास वाटलें, तेव्हां त्याणें आपणांस गादीवर बसविणारे जे मराठे लोक त्यांस दिल्लींतून हांकून देण्याविषयीं आपल्या मुसलमानीं सरदारांस सांगितलें. त्यावरून पुढें मराठी सरदार महादजी शिंदा व विसाजी कृष्ण यांणीं मोंगलांस लढाई करून जिंकलें. तेव्हां दिल्ली व तेथील बादशाहा पूर्णपणें यांचे हस्तगत झाला. परंतु इतकें होण्यापूर्वींच माधवराव बल्लाळ पेशवा दक्षिणेंत, थेऊर गावीं वारल्याची वातमी आली होती, सबब विसाजी कृष्ण लश्करसहीत पुण्यास माघारा आला. हें वर्तमान सन १७७२ त घडलें.

५ माधवराव बल्लाळ वारल्यावर पेशव्याचें आधिपत्य व कारभार चालविण्याविषयीं बहूतकज्जे झाले. तसेंच दिल्ली येथील बादशाहाचें राज्य निरबल झाल्यामुळें मुसलमान सरदारांमध्यें आपसांत कज्जे होऊं लागले. ती संधी यास सांपडून नर्मदेच्या उत्तरेस पेशव्यांचे हक्क वसत्ना होती ती, व इतर राजांकडून बादशाहास पोंचणारे हक्क व खंडण्या यांचा आपणच मालक होऊन उपभोग करूं लागला. आणि आपण स्थापन केलेल्या राज्यांत पेशव्यांचा उपद्रव नबाधावा यास्तव त्यावेळीं पुण्याचा मुख्य कारभारी नानाफडणवीस यास जरी आपण साहाय असे, तथापि त्याणें आपणांहून वरिष्ठ नव्हावें व उत्तरेकडील कारभारांत त्यास मन घालण्यास फुरसत नहोतां त्यालाच आपली नेहमीं गरज लागावी म्हणून याणें त्याशीं व इंग्रजांशीं वांकडें पडण्या करितां इंग्रजांचा किल्ला घेण्या विषयीं नानास मसलत सांगितली आणि याशिवाय राघोबा दादा ईंदुरास याच्या

आश्रयास आला, तेव्हां त्याचा पक्ष आपण स्वीकारतों असें नानास व इंग्रजांस भासविलें. पुरंदरचा तह झाल्यानंतर फ्रेंचांचा वकील पुण्यांत सन्मान पावला, त्या योगें इंग्रजांनीं राघोबा दादास पुण्याचे गादीवर बसविण्याचा बेत केला. त्यासमयीं नानास सहाय करून तो बेत सिध्धीस न जाऊंदेणें, व वडगांव एथें तह ठरल्यावर राघोबा दादा व कारभारी मंडळी यांत आपण मध्यस्त होणें व नानाचे पक्षाचा आपण खचीत आहें हें दाखविण्या करितां याजवळ राघोबा दादाचे पक्षपाती सखारामबापू व चिंतोविठ्ठल होते, त्यांस नानाचे हवालीं करणें, या सर्व गोष्टी जरी कांहीं काळाचे अंतरानें व निरनिराळया प्रसंगानें घडल्या तथापि त्या, पुण्यांतील कारभारी मंडळीचें लक्ष आपण संपादिलेल्या राज्याकडे न लागावें, या संबंधाच्या होत्या.

६ सन १७७५त इंग्रज व मराठे यांमध्यें जी लढाई झाली तींत महादजी-शिंदा प्रमुख सरदार होता आणि वडगांव मुक्कामीं तह झाला त्यांत महादजी शिंद्यास भडोच किल्ला द्यावा असें ठरलें होतें; परंतु हा तह व मागें ठरलेला पुरंदर येथील तह याप्रमाणें उभय सरकारां कडून चालणें होईनासें झालें, तेव्हां कलकत्याहून सहा हजार फौज निशीं जनरल गाडडसाहेबास मराठ्यांचे मुलखांतून खुषकीनें मुंबईस जाण्या करितां पाठविलें. त्याला मराठे उपद्रव करित असतांही तो भोपाळ्यास जाऊन तेथील नबाबाचे मदतीनें बऱ्हाणपुरावरून सुरतेस जाऊन पोहोंचला, आणि तेथून नानाफडणवीस व शिंदे वगैरे दुसरे मराठी सरदार यांणीं पुरंदरचे तहा प्रमाणें वागावें या विषयीं उद्योग करूं लागला. परंतु कांहीं घेण्या देण्याच्या कमजास्ती पणा मुळें ती गोष्ट सिध्धीस न गेल्या कारणानें त्या गाडड साहेबानें मराठी सरदारांतून कोणाचाच पक्ष न धरितां आपणच मराठ्यांशीं लढण्याचा निश्चय करून मुंबईहून आपल्या कुमकेस आणखी फौज मागून घेतली, आणि गाइकवाड व इंग्रज यांचा तह ठरला त्यांत पेशव्यांचा अमदावाद किल्ला घेऊन तो गाइकवाडाचे हवालीं करण्याचें ठरलें होतें, सबब सन १७८० च्या आरंभीं गाडडसाहेबानें अमदावादेस जाऊन महत्प्रयासानें तो किल्ला घेतला.

७ याप्रमाणें इंग्रज गुजराथेंत जय पावत असतां महादजी शिंदा यानें होळकराचे व आपले मिळून वीसहजार स्वार बरोबर घेऊन तो त्या गाडडसाहेबाशीं लढण्या करितां निघाला. तो नर्मदा उतरून बडोद्या जवळ गेला तेव्हां महादजीचा पराभव करण्यास जनरल गाडडही लश्कर सहित बडोद्याकडे चालिला. परंतु इंग्रज सन्निध आल्याचें ऐकून शिंदा पवनगडास गेला आणि तेथून त्याजवळ वडगांवच्या तहाचा करार पुरा होण्या साठीं दोन साहेब ओलीस होते त्यांस आपण इंग्रजांचा स्नेही आहे असें दाखविण्या करितां गाडडसाहेबाकडे पाठविलें. आणि तहाचें बोलणें लावण्या करितां त्या कडे आपला वकील ही पाठविला. परंतु तो साहेब ह्मणाला कीं," काय ठरविणें असेल तें तीन दिवसांत ठरवावें." त्यावरून शिंद्यानें सांगून पाठविलें कीं," वडगांव येथें तहांत ठरल्या प्रमाणें रघोबादादा जो पूर्वी शिंद्याचे मध्यस्ती प्रमाणें बुंदेलखंडांत जाहागीर घेण्यास जावा असें ठरलें असतां पळून इंग्रजांकडे गेला आहे, तो झांशी जवळ आपली ठरलेली बारालक्षांची जाहागीर घेण्यास जाई असें झालें पाहिजे." त्यावर गाडडसाहेब ह्मणाला कीं," त्याची खुशी असल्यास तो जाईल, त्याजवर जुलूम होणें नाहीं," त्यावरून अर्थातच पुढें लढाईचा रंग दिसला. यास्तव शिंद्यानें आपलें सर्व जड सामान पवनगडाचे आश्रयास ठेऊन आपणांवर इंग्रजांचा एकाएकीं हल्ला न यावा ह्मणून खबरे करितां फौजेच्या लहान लहान टोळ्या आसंमतांत ठेऊन मुख्य फौजेचा भाग घेऊन हुशारीनें राहिला होता. तथापि सन १७८० च्या एप्रील महिन्याच्या २ ऱ्या तारखेस गाडडसाहेब याणें शिंद्याचे फौजेवर छापा घालण्याचा निश्चय करून तसें केलें; परंतु दोन लश्करांमध्यें तफावत किती व शिंद्याच्या लश्करा पर्यंत पोंचण्यास अवकाश किती लागेल याचा अदमास त्यास न कळल्या मुळें आणिलेला छापा महादजी शिंद्याचे छावणीस पोंहोंचण्या पूर्वींच उजाडलें, आणि त्याणें जरी याजवर तोफांचा भडमार चालविला, तथापि शिंद्यास हल्ल्याची बातमी पूर्वींच कळली होती, सबब त्याचें लश्कर इंग्रजी तोफांचा भडमार चुकविण्या करितां एकीकडे सरलें तेव्हां तो साहेब समज-

ला कीं, मराठ्यांचा मोड झाला, आणि त्यांच्या पाठीमागें एक बंगाली स्वारांची-टोळी पाठविली, परंतु तिचाही हल्ला चुकाविण्या करितां मराठे एकीकडे झाले, व या हल्ला करणाऱ्या स्वारां पैकीं पंधरा असामी पडले. मराठे एकीकडे-झाले हें तो साहेब समजला, कीं त्यांचा अगदीं मोड झाला; परंतु दुसऱ्या दिवशीं जेव्हां मराठी फौज इंग्रजांचे छावणी नजीक तळ देऊन पडली, तेव्हां तो समजला कीं, आदले दिवशीं लढाईंत जय अप जय कोणाचाच नहोतां उभय पक्षीं मोठा नाश मात्र झाला. या नंतर तीं दोन्हीं लश्करें सुमारें तीन कोसांचे अंतरानें मोठ्या बंदोबस्तानें पडलेलीं होतीं, आणि शेवटीं त्याच महिन्याच्या १९व्या तारखेस लढाई झाली, त्यांत इंग्रज मोठ्या निकरानें लढत असतांही मराठे तळ देऊन मोठ्या शौर्यानें लढले. आणि इंग्रजी फौजेस आंपल्या बाणाच्या टप्यांत येऊं देऊन त्यांजवर अशी सरबती केली कीं, तेणें करून इंग्रजांचा बहुत नाश होऊन मोड झाल्या मुळें तो गाडडसाहेब आपली फौज घेऊन मागें गेला, आणि पावसाळा घालविण्या करितां नर्मदेच्या कांठीं छावणी करून राहिला.

८ असा गुजराथेंत महादजी शिंद्याचा जय होत असतां त्याणें अमदाबाद वगैरे परत घेण्याचीं कामें चालविलीं असतीं; परंतु बंगाल सरकारानें गोहदचे राण्याशीं स्नेह करून त्यांणीं येकोप्यानें शिंद्याशीं लढण्या करितां एक फौजेची टोळी कपतान ( पोफाम ) याचे हाता खालीं दिली, ती गोहदच्या राण्याचे फौजेस मिळून शिंद्याचे मुलखांत बहुत उपद्रव करूं लागली व त्या फौजेनें ग्वाल्हेरचा किल्ला जो अजिंक्य असा मानलेला होता, तो आपले फौजेचा कांहीं नाश न होऊं देतां घेऊन राण्याचे हवालीं केला. आणि पुढें कछ वायघारंतील लाहोर नांमें किल्ला घेऊन पुढें स्वारी करून ती फौज सिरोंजेकडे चालिली. यास्तव महादजी शिंदा गुजराथ सोडून आपल्या फौजेच्या कुमकेस बुंदेल खंडांत आला, आणि पुढें लढाया होऊं लागल्या. त्यांत शिंद्यानें वीसदिवस पर्यंत पाठलाग करून इंग्रजी फौजेस बहुत हैराण केलें, परंतु एके दिवशीं मराठे अगदीं असावध आहेत, अशी संधी पाहून इंग्रजांनीं त्या शिंद्याचे फौजेवर रात्रीं हल्ला केला; त्यांत त्यांणीं

७ याप्रमाणें इंग्रज गुजराथेंत जय पावत असतां महादजी शिंदा याणें होळकराचे व आपले मिळून वीसहजार स्वार बरोबर घेऊन तो त्या गाडड-साहेबाशीं लढण्या करितां निघाला. तो नर्मदा उतरून बडोद्या जवळ गेला तेव्हां महादजीचा पराभव करण्यास जनरल गाडडही लश्कर साहित बडोद्या-कडे चालिला. परंतु इंग्रज सन्निध आल्याचें ऐकून शिंदा पवनगडास गेला आणि तेथून त्याजवळ वडगांवच्या तहाचा करार पुरा होण्या साठीं दोन साहेब ओलीस होते त्यांस आपण इंग्रजांचा स्नेही आहें असें दाखविण्या करितां गाडडसाहेबाकडे पाठविलें. आणि तहाचें बोलणें लावण्या करितां त्या कडे आपला वकील ही पाठविला. परंतु तो साहेब ह्मणाला कीं, " काय ठरविणें असेल तें तीन दिवसांत ठरवावें." त्यावरून शिंद्यानें सांगून पाठविलें कीं, " वडगांव येथें तहांत ठरल्या प्रमाणें राघोबादादा जो पूर्वीं शिंद्याचे मध्यस्ती प्रमाणें बुंदेल खंडांत जाहागीर घेण्यास जावा असें ठरलें असतां पळून इंग्रजांकडे गेला आहे, तो झांशी जवळ आपली ठरलेली बारालक्षांची जाहागीर घेण्यास जाई असें झालें पाहिजे." त्यावर गाडडसाहेब ह्मणाला कीं, " त्याची खुशी असल्यास तो जाईल, त्याजवर जुलूम होणें नाहीं," त्यावरून अर्थातच पुढें लढाईचा रंग दिसला. यास्तव शिंद्यानें आपलें सर्व जड सामान पवनगडाचे आश्रयास ठेऊन आपणांवर इंग्रजांचा एकाएकीं हल्ला न यावा ह्मणून खबरे करितां फौजेच्या लहान लहान टोळ्या आसंमतांत ठेऊन मुख्य फौजेचा भाग घेऊन हुशारीनें राहिला होता. तथापि सन १७८० च्या एप्रील महिन्याच्या २ र्‍या तारखेस गाडडसाहेब याणें शिंद्याचे फौजेवर छापा घालण्याचा निश्चय करून तसें केलें; परंतु दोन लश्करांमध्यें तफावत किती व शिंद्याच्या लश्करा पर्यंत पोंचण्यास अवकाश किती लागेल याचा अदमास त्यास न कळल्या मुळें आणिलेला छापा महादजी शिंद्याचे छावणीस पोंहोंचण्या पूर्वींच उजाडलें, आणि त्याणें जरी याजवर तोफांचा भडमार चालविला, तथापि शिंद्यास हल्ल्याची बातमी पूर्वीच कळली होती, सबब त्याचें लश्कर इंग्रजी तोफांचा भडमार चुकविण्या करितां एकीकडे सरलें तेव्हां तो साहेब समज-

ला कीं, मराठ्यांचा मोड झाला, आणि त्यांच्या पाठीमागें एक बंगाली स्वारांची-टोळी पाठविली, परंतु तिचाही हल्ला चुकाविण्या करितां मराठे एकीकडे झाले, व या हल्ला करणाऱ्या स्वारां पैकीं पंधरा असामी पडले. मराठे एकीकडे-झाले हें तो साहेब समजला, कीं त्यांचा अगदीं मोड झाला; परंतु दुसऱ्या दिवशीं जेव्हां मराठी फौज इंग्रजांचे छावणी नजीक तळ देऊन पडली, तेव्हां तो समजला कीं, आदले दिवशीं लढाईंत जय अप जय कोणाचाच नहोतां उभय पक्षीं मोठा नाश मात्र झाला. या नंतर तीं दोन्हीं लश्करें सुमारें तीन कोसांचे अंतरानें मोठ्या बंदोबस्तानें पडलेलीं होतीं, आणि शेवटीं त्याच महिन्याच्या १९व्या तारखेस लढाई झाली, त्यांत इंग्रज मोठ्या निकरानें लढत असतांही मराठे तळ देऊन मोठ्या शौर्यानें लढले. आणि इंग्रजी फौजेस आपल्या बाणाच्या टप्यांत येऊं देऊन त्यांजवर अशी सरबती केली कीं, तेणें करून इंग्रजांचा बहुत नाश होऊन मोड झाल्या मुळें तो गाडडसाहेब आपली फौज घेऊन मागें गेला, आणि पावसाळा घालविण्या करितां नर्मदेच्या कांठीं छावणी करून राहिला.

८ असा गुजराथेंत महादजी शिंद्याचा जय होत असतां त्यांणें अमदावाद वगैरे परत घेण्याचीं कामें चालविलीं असतां; परंतु बंगाल सरकारानें गोहदचे राण्याशीं स्नेह करून त्यांणीं येकोप्यानें शिंद्याशीं लढण्या करितां एक फौजेची टोळी कपतान ( पोफाम ) याचे हाता खालीं दिली, ती गोहदच्या राण्याचे फौजेस मिळून शिंद्याचे मुलखांत बहुत उपद्रव करूं लागली व त्या फौजेनें ग्वाल्हेरचा किल्ला जो अजिंक्य असा मानलेला होता, तो आपले फौजेचा कांहीं नाश न होऊं देतां घेऊन राण्याचे हवालीं केला. आणि पुढें कच्छ वायघाटांतील लाहोर नामें किल्ला घेऊन पुढें स्वारी करून ती फौज सिरोंजेकडे चालिली. यास्तव महादजी शिंदा गुजराथ सोडून आपल्या फौजेच्या कुमकेस बुंदेल खंडांत आला, आणि पुढें लढाया होऊं लागल्या. त्यांत शिंद्यानें वीसदिवस पर्यंत पाठलाग करून इंग्रजी फौजेस बहुत हैराण केलें, परंतु एके दिवशीं मराठे अगदीं असावध आहेत, अशी संधी पाहून इंग्रजांनीं त्या शिंद्याचे फौजेवर रात्रीं हल्ला केला; त्यांत त्यांणीं

दाहा तोफा बळकाविल्या. त्यानंतर उभय पक्षींही युध्द करण्याची हयगय दिसूं लागली, त्याचें कारण असें कीं, तो साहेब युध्द करून बहुत थकला होता, सबब त्या फौजेस विसावा देण्यास उत्सुक होता; याशिवाय गोहदचा राणा ज्याच्या हि॰ता करितां ही लढाई करीत होता त्याकडून इंग्रजांनीं इछिल्या प्रमाणें मदत होईना, व महादजी शिंदा याचे मनांत पूर्वीं पासून इंग्रजांशीं तह करण्या विषयीं होतेंच, सबब त्या साहेबानें ती गोष्ट कलकत्यास लिहिली. त्या वरून तेथें मसलत ठरली कीं, तूर्त टिपूशीं लढाई करणें अवश्य पडलें आहे, याज करितां महादजी शिंद्याचे मार्फत मराठ्यांशीं तह करून इकडील लश्कर श्रीरंग पट्टणाकडे पाठवावें. यावरून पुढें कलकत्याहून कोणी अंडरसन नामें साहेब पुण्यास आला त्याची व महादजी शिंद्याची सालबे मुक्कामीं गांठ पडून मराठी सरदारांत शिंद्यास मुख्य मानून तह झाला, त्यांत इंग्रजांनीं मराठ्यांचा नवीन घेतलेला सर्व मुलूख सोडून दिला. व गोहदच्या राण्याचा मुलूख शिंदा घेतो, त्यास अथवा दुसरे कोणते ही प्रकारें शिंद्यास इंग्रजांनीं अडथळा करूंनये असें ठरलें. व लाहार व ग्वाल्हेर हे ही किल्ले शिंद्याचे स्वाधीन करून त्याचे दरबारांत नेहमीं राहण्या करितां एक रेसिडेंट नेमिला, यामुळें शिंदा स्वतंत्र राजा असें ठरून त्याणें स्थापित केलेल्या राज्यास बळकटी आली. हें वर्तमान ता॰ १७ माहे मे सन १७८२ त सालबे मुक्कामीं घडलें.

०. या झालेल्या तहांत असेंही आणखी ठरलें होतें कीं, टिपूनें इंग्रज व पेशव्यांचा मुलूख घेतला आहे, तो मराठ्यांनीं व इंग्रजांनीं मिळून सोडवावा, सबब महादजी शिंदा यास हिंदुस्थानांत॰ जाण्या पूर्वीं श्रीरंगपट्टणचे कामांत मन घालावें लागलें होतें.

शिंद्याचे घराण्याचा इतिहास.

## भाग ४.

मागील भागांत सन १७८२ सालीं सालपे मुकामीं इंग्रजांशीं तह ठरून महादजी शिंद्यास मराठी मंडळांत वरिष्ठता प्राप्त झाली, हें लिहिलें. या भागांत त्याणें पुढें कायकाय केलें तें लिहिलें आहे. ही एक गोष्ट लक्षांत आणिली पाहिजे कीं, महादजी शिंद्याचा बाप राणोजी राव शिंदा आपल्या धन्याच्या वर्तणुकी विषयीं अहमदशाहा बादशाहा कडे जामीन झाला होता, आणि पुढें चाळीस वर्षां नंतर त्याचा दासीपुत्र महादजी हा सर्व मराठी मंडळाचे चांगले वागणुकी विषयीं इंग्लिशां कडे जामीन राहिला, आणि तेव्हां पासून हा अगदीं स्वतंत्र राजा होऊन इंग्लिश लोक याजला महाराज शिंदा असें म्हणूं लागले.

२ एथ पर्यंत इंग्रजांशीं लढाया चालल्या होत्या त्यामुळें, महादजी शिंद्याचें मन पेशव्याचें राज्य वांचविण्याकडे लागलें होतें. सबब नर्मदेच्या उत्तरेस त्याणें खासगत स्थापलेल्या राज्याच्या बंदोबस्ताकडे तादृश मन लावण्यास त्यास अवकाश सांपडला नवता. परंतु सालपें मुकामीं इंग्लिशांशीं तह ठरल्या मुळें त्याला हिंदुस्थानांत येण्यास वेळ सांपडला. तो नर्मदेच्या उत्तरेस आल्यावर ज्या लोकांनीं मागील लढाईचे वेळीं ठाणीं बळकाविलीं होतीं, तीं त्याणें परत घेऊन पुनः त्यांपासून खंडण्या वसूल करण्याचें काम चालविलें. तसेंच गोहद येथील राण्यानें व राघुगडचे ठाकुरानें कांहीं मुलूख बळकाविला होता, तोही त्यानें सोडविला, व ग्वाल्हेर व भडोच वगैरे किल्ले तहनाम्या प्रमाणें त्याचे हस्तगत झाले.

३ गोहदचा किल्ला घेण्या करितां त्याणें त्यास वेढा घातला तो उठविण्या विषयीं त्या वेळच्या एका लढाईंत ( करनलडी बाईन ) नामें एके फ्रेंच सरदाराचें युध्ध कौशल्य व शौर्य हीं महादजी शिंद्याचे मनांत बहुत ठसलीं, व त्या पूर्वीं त्याच्या फौजेस तळ देऊन लढण्याचें सामर्थ्य व कुशळता हीं नवतीं सबब कित्येक ठिकाणीं याजला गढ्या व किल्ले घेण्यास मोठी अडचण पडे ती दूर होण्या करितां शिंद्यानें या सरदाराप्रत कवाइत शिकलेल्या दोन पलटणांची भर-

ती करण्या करितां सांगून व कांहीं तोफा त्यास देऊन त्यांचें आधिपत्य त्याकडे-सच सांगितलें. नंतर प्रसंगानें फौजही अधिक वाढविली.

४ चंबल्या नदीच्या दक्षिणेस महादजी शिंद्याचा असा भरभराट चालला असतां तो हिंदुस्थानांत जाण्याचें कारण झालें. तें असें कीं, सन १७७२ त मराठ्यांचें लष्कर शाहा अलंम बादशाहास गादीवर बसऊन दक्षिणेस परत गेलें. त्या नंतर नजीब खान नांमें कोणी पूर्वी मराठ्यांनीं पदभ्रष्ट केलेला सरदार दिल्लीच्या बादशाहाचा कारभार करीत होता, तो सन १७८२ च्या एप्रील महिन्यांत मृत्यु पावला. तेव्हां त्याचा एक दत्तक पुत्र होता त्याजला बादशाहा सामील असतां ही त्याच्या कारभारास सरदार लोक अडथळा करतील असें दिसूं लागलें. तेव्हां त्याणें शिंद्याचें सहाय मागितलें. त्यावरून तो आग्र्यास गेला. तेथें त्या दत्तक पुत्राची व त्याची गांठ पडली. परंतु पुढें तो लौकरच मारेकऱ्यां कडून मारला गेला, सबब शिंदा दिल्लीस स्वयें जाऊन त्याचा कारभार करूं लागला; व बादशाहानेंही दिल्ली व आग्रा हीं शहरें शिंद्याचे हवाली केलीं. ही बातमी ऐकून दक्षिणेतील मराठे व विशेष करून नाना फडणवीस यांस ही आश्चर्य वाटलें. आणि या लाभांत आपला ही हिसा आहे असें दाखविण्या करितां शिंद्याचे मदतीस फौजेची एक टोळी पाठविली, व तिज बरोबर आपला हिसा सरण्या करितां दोन कामदार नेमले.

५ इतकीं कृत्यें करण्यास महादजी शिंद्यानें जी फौज ठेविली होती तिच्या खर्चास पुरे इतका पैसा त्याजवळ नाहींसा झाला, यामुळें त्याणें कांहीं मुसलमान सरदारांच्या जाहागिरी जप्त केल्या, आणि पूर्वी रजपूतलोक दिल्लीच्यां बादशाहास खंडणी देत आल्या प्रमाणें ती शिंद्यानें बादशाहाचे नांवानें त्यांजपाशीं मागितली. परंतु त्यावरून बादशाहाची शिंद्यावर इतराजी झाली; रजपूत लोक खंडणी सहज देणार नाहींत असें त्यास वाटलें, सबब तो लष्कर सहित जयपुरा जवळ गेला, आणि सर्व रजपुतां पासून साठलक्ष रुपये मागितले. तेव्हां त्यांणीं त्यांपैकीं कांहीं ऐवज देऊन बाकी कांहीं मुदतीनें देऊं असें ठरविलें. आणि त्या प्रमाणें त्यांणीं दिला ही असता, परंतु महादजी तेथून मागें फिरल्यावर त्याचे

प्रतिस्पर्धी मुसलमान लोक यांनीं शिंदा बादशाहाचे मर्जींतून उतरल्याचें त्या रजपूत लोकांस कळविलें. यामुळें त्याणें बाकीची खंडणी नियमित काळीं मागण्या करितां रयाजी पाटील नामें आपला सरदार कांहीं फौज बरोबर देऊन पाठविला होता, त्याज बरोबर रजपूत व त्यांस मिळालेले मुसलमान सरदार यांणीं लढाई करून त्यास मागें हटाविलें.

६ यावरून रजपुतांचा सूड उगांविण्या करितां महादजी, डिबाईन याचें बुंदेल खंडांतून लश्कर आणून, तें व आपाजी खंडेराव यांची फौज, त्याशिवाय बादशाही लश्कर हीं बरोबर घेऊन सन १७८७ त दिल्लीहून जयपुराकडे चालला. परंतु तेथें गेल्यावर पाहिलें तों जयपूर, जोतपूर व राजस्थानांतलि दुसरीं संस्थानें यांचें सैन्य मराठ्यांशीं युध्ध करण्या करितां एकवटलें होतें. सबब त्या बलाढ्य फौजेशीं त्यासमयीं आपला जय होईलच असें त्या शिंद्यास वाटलें नाहीं या कारणानें त्याणें त्याशीं तहाचें बोलणें लाविलें, त्या योगें हा भ्याला असें त्यांणीं जाणून याच्या फौजेस ते रजपूत लोक बहुत त्रास देऊं लागले, तेव्हां तो त्रास बादशाहा कडील आलेल्या फौजेंतील लोकांस सोसवेनासा झाला. त्या कारणानें त्यांतील मुख्य सरदार महमद बेग अमदानी व इस्मायलबेग हे रजपुतांस जाऊन मिळाले. यावरून शिंद्यानें विचार केला कीं, जर आतां युध्धास विलंब लाविला,तर सर्व मुसलमानी फौज शत्रूस जाऊन मिळेल. यास्तव त्याणें आपलें सर्व जड सामान व मोठ्या तोफा ग्वाल्हेरीस रवाना करून आपण सड्या फौजेनिशीं मोठ्या बंदोबस्तानें राहिला. इतक्यांत बादशाहा कडील सर्व मुसलमानी पायदळ फितूर होऊन त्यांज बरोबरच्या ८० तोफां सहवर्तमान रजपुतांस जाऊन मिळाले. त्यामुळें महादजी शिंदा मोठ्या संकटांत पडला, तथापि धीर अगदीं न सोडितां रजपूत लोक रोज हल्ला करीत त्यांशीं मराठी फौज व डीबाईनचीं पलटणें यां सह वर्तमान लढून मागें हटत हटत दीग पर्यंत आला, आणि जाट लोकांस सहाय करून घेण्या करितां, त्यांजला दीगचा किल्ला दिला. आणि तेथील सर्व तोफा वगैरे जड सामान काढून तें जाटाच्या दुसऱ्या भरत पूर नामें किल्यांत ठेऊन पुढें आग्रा व अलीगड येथील किल्यांत शिबंदीचा चांगला बंदोबस्त करून तो ग्वाल्हेरीस गेला.

९ रजपुतांशीं लढाईंत असा मोड झाला, व मुसलमानांचा बादशाहा हातीं आलेला परत गेला असें झालें तरी महादजी शिंद्यानें धीर सोडिला नाहीं. यासमयीं त्याणें नानाफडणविसास लिहिलें कीं, सर्व मराठ्यांचा मान राखण्या करितां व हित करण्या करितां जो पराजय झाला आहे तो उलटविण्यास तुम्ही मत्सर न करितां माझे मदतीस फौज पाठवावी, यावरून नानाफडणवीस यानीं तुकोजी होळकर व अलीबाहदर यांस त्यांचे फौजेनिशीं त्याचे मदतीस पाठविलें.

१० परंतु दक्षिणेंतून फौज मदतीस येण्या पूर्वींच शिंद्याचा अगदीं मोड झाला, असें रजपूत लोक समजले, आणि पुढें आग्रा वगैरे शिंद्याच्या जागा घेण्यास मुसलमानांस मदत न करितां त्यांची एकत्र झालेली फौज आपआपल्या स्थळास गेली. तथापि आग्रा व अलीगड वगैरे शिंद्याचे अमलांतील जागा घेण्याचा प्रयत्न इस्मायल बेग व त्यास मिळालेला गुलाम कादर नामें रोहिल्यांचा सरदार हे स्वयंत्न करूं लागले. तेव्हां शिंद्यानें आपल्या शिवबंदीच्या कुमकेस राणाखान व डीबाईन यांस पलटणी व दुसरी फौज देऊन पाठविलें. तेव्हां तो राणाखान प्रथम भरतपुरास जाट लोकांकडे गेला. कारण ते लोक मराठ्यांचे साहाय करीत होते. आणि तेथून पुढें त्यांची आणखी फौज मदतीस घेऊन आग्र्यास लखबा दादा नामें किल्लेदार होता, त्याचे मदतीस निघाला. तो भरतपुरापासून आठ कोसांवर गेला तों, त्यांच्या येण्याची खबर इस्मायलबेग यास कळून त्याणें आग्र्यास लखबादादा याशीं लढण्याचें काम तहकूब ठेऊन त्याची व राणेखानाचे फौजेची गांठ पडूं न देण्या करितां त्यास अडविण्यास आला, तेव्हां त्या दोनही फौजांचें मोठ्या निकरानें युध्द होऊं लागलें; त्यांत प्रथम शिंद्याची फौज व विशेष करून जाटांचीं पलटणें यांणीं इस्मायल बेगाचा पराभव केला असता, परंतु जाटांकडील आणखी तीन पलटणें कोणी जाहागीरखान या नांवाचे मुसलमानी अधिकाऱ्याच्या स्वाधीन होतीं, आणि तो त्या पलटणा सहवर्तमान इस्मायल बेगास मिळाला त्यामुळें तेदिवशीं राणेखानाचा मोड झाला आणि तो परत भरत पुरास येऊन छावणी करून राहिला.

११ यापुढें इस्मायलबेगानें आग्र्याचा किल्ला घेण्याचा बहुत प्रयत्न केला, परंतु

तेथील किल्लेदार लखबा दादा याचें शौर्य व युध्द कौशल्य यापुढें त्याचा कांहीं इलाज चालेना. तशांत त्याचा सहाय करता गुलाम कादर रोहिला, याचे जाहागिरीचे मुलखांत राणेखानानें मदत देऊन शिख लोकां कडून उत्तरें कडून स्वारी करविली, त्यामुळें तो त्यांचे निवारणार्थ तिकडे गेला, आणि शिंद्यानें ती संधी साधून राणेखान यास आणखी मदत पाठऊन त्याज कडून आग्रा एथें इस्मायलबेग याजवर हल्ला करविला. त्या लढाईंत त्याचा अगदीं पराभव होऊन तो एकटा जिवानिशीं आपल्या मजबूत घोड्याचे सहायानें जखमी झालेला यमुना पार उतरून गुलाम कादर याचे लश्करास जाऊन मिळाला. ही लढाई सन १७८८ त जून महिन्याचे १९ वे तारखेस झाली.

१२ यात्रमाणें आपल्या फौजेचा आग्रा एथें पराजय झाला असतां महादजी शिंदा गाफीलपणें पुढें दिल्लीस नजातां आपणांस पुण्याहून मदत येण्याची व मुसलमान लोकां मध्यें आपसांत तंटा होण्याची वाट पाहत बसला. इतक्यांत गुलाम कादर व इस्मायलबेग यांणीं दिल्लीस जाऊन आपल्या लश्कराचे निमित्तानें बादशाहाचा महाल लुटून अत्यंत क्रूरतेनें खंजिरीचे अणिनें त्याचे डोळे काढले व त्याचे बायका मुलांवर विभित्स रीतीचा जुलूम करून त्यास पदच्युत केलें, आणि त्याचा मुलगा बेदर बखत नामें होता, त्यास दिल्लीचे गादीवर बसाविलें. या अघोर कृत्यामुळें इतर मुसलमान सरदार व इस्मायलबेग यांस बहुत वाईट वाटलें, आणि त्यांमध्यें दुफळी झाली, व पुण्याहून शिंद्याचे मदतीस निघालेले तुकोजी होळकर व अलीबाहदर हेही त्यास येऊन मिळाले. तेव्हां त्यांची मदत घेऊन राणेखान, आपाजी खंडेराव, अलीबाहदर, याशिवाय डीबाईन याची फौज, माधवरावफाळके याज बरोबर दिल्लीस रवाना करून, शिंदा मथुरा एथें छावणी करून राहिला. ही पाठविलेली फौज दिल्लीजवळ आल्याचें ऐकून गुलाम कादर पळाला, आणि तेथील लोकांनीं शिंद्याचे फौजेस मोठ्या आनंदानें येऊं दिलें. आणि त्यांज कडून गुलाम कादरास पकडण्या करितां, एक फौजेची टोळी तयार करविली. परंतु तो आपल्या लोकां सहित तेथून पळाला, तो मिरतें एथें किल्ल्याचे आश्रयास आपल्या लोकांसहवर्तमान जाऊन बसला. मराठ्यांनीं तेथें ही पाठलाग करून त्या किल्ल्यास वेढा घातला, आणि

तेथें अन्नाची वगैरे विशेष सामग्री नवती यामुळें तो तेथून घोड्या वरून पळून जात असतां गर्तेस पडून अचेतन झाला. दुसऱ्या दिवशीं तो कोणी एका मराठ्यास उमगला, त्याणें त्यास शिंद्याचे छावणींत आणिलें. आणि तेथून महादजी शिंदा मथुरेस होता त्याजवळ त्याला नेलें, तेव्हां त्याणें बादशाहाचे निरपराध डोळे काढिले होते, त्याचे शामनार्थ शिंद्यानें त्यास ठार मारलें. या शिवाय त्याज बरोबर बादशाहाचा मुलगा बेदरबखत हाही मिरतचे किल्यांत मराठ्यांचे हातीं लागला होता त्याजला अगदीं दुःख न देतां बादशाहाचे हवालीं केलें. परंतु तोही गुलाम कादराम मिळून बापाचे तक्तावर बसला. या अन्यायामुळें आपल्या पुत्रास बापानें ठार मारलें; आणि शिंद्याचे सहायानें शाहाअलम पुनः गादीवर बसला. हें वर्तमान सन १७८९ त घडलें.

१३. यानंतर महादजी शिंदा याणें गुलामकादर याची जाहागीर व सर्व दुआबप्रांत हीं सहज घेतलीं. आणि या पूर्वी त्याणें संपादलेला एकतृतीयांश माळवा, बुंदेलखंडाचा अर्धा भाग, गुजराथेंतील कांहीं भाग व दक्षिणेंतील कित्येक संस्थानें, इतक्यांचा हा खरोखर राजा झाला. सारांश सतलज नदी पासून तापी नदी पर्यंत याचा अमल चालू झाला. आणि या समयीं त्याणें बादशाहा पासून पेशव्याचे नांवानें वकील मुतलकीची सनद करून घेऊन पेशव्याचा हस्तक महादजी शिंदा याणें दिल्लीस बादशाहाचा कारभार वंश परंपरेनें करीत असावा असें त्याच सनदेंत लिहून घेतलें.

१४. महादजी शिंद्यास अशी संपदा प्राप्त झाली, तेव्हां त्याणें विचार केला कीं, आपण संपादलेल्या राज्याचे रक्षणास आपणाजवळ प्रबळ फौज नाहीं, कारणकीं, मराठी फौज जरी शूर असे आणि एकेक माणसाकडे पाहिलें असतां मनुष्यही चपळ दिसत, परंतु जैमावानें जीं कामें होणें, तीं महादजी शिंद्याच्या मनाप्रमाणें होत नसत. कारण, सांकेतिक शब्दांनीं काम करून हुकुमास तत्पर असण्याची चाल त्याफौजेस माहित नवती, यास्तव त्याणें आपली फौज सुधारली. ती अशी कीं, त्याणें आपले स्वारांस खांटे पर्यंत इजारा घालण्याची चाल लावली. रजपूत व मराठे लोक आणखी चाकरीस ठेऊन त्यांच्या रीतीही कांहीं सुधारल्या. याशिवाय गोसावी लोकांची एक टोळीही नवीनच चाकरीस ठेविली.

आणि डीबाईनचीं पलटणें प्रथम दोन ठेविलीं होतीं, तीं कांहीं काळानें आठकेलीं. व यासमयीं तीं सोळा करून त्यांजबरोबर ८० तोफानेमल्या, व याशिवाय त्यांचे मदतीस दीडहजार स्वार ठेऊन त्या सर्वांचा अधिकार करनलडीबाईन यासच सांगितला, आणि त्याचेच मार्फत आणखी कांहीं युरोपियन लोक चाकरीस ठेविले. त्यांत एक सांगस्टर नामें होता, त्याणें शिंद्यास साठ तोफा चांगल्या ओतून दिल्या. या सर्व गोष्टींमुळें त्याची ताकत अवरंगजेब बादशाहाची कारकीर्द खेरीज करून हिंदुस्थानांतील सर्व राज्यांपेक्षां अधिक वाढली.

१८ शिंद्याचें इतकें प्राबल्य वाढलें हें तुकोजी होळकर व अलीबाहदर हे दक्षिणेतून पेशव्यांकडून याचे मदतीस आले होते, त्यांस सहन होईना म्हणून ते, त्यास कांहीं एक मदत करीत नसत; यामुळें ते परत पुण्यास बोलाविले जीण्याचा प्रयत्न करण्याकरितां, बादशाहाकडून पेशव्याचे नांवानें पूर्वीं संपादलेली वकीलमुतलकीचीसनद, पेशव्यास सादर करण्याचें निमित्तकरून शिंद्यानें आपण पुण्यास जाण्याचा निश्चय केला, परंतु त्याचा रजपूत लोकांनीं पूर्वीं पराजय केला होता, सबब त्यांशीं लढून खंडण्या वसूल करण्याचें याचे मनांत होतें, सबब पुण्यास जाण्यापूर्वीं याणें रजपूत लोकांशीं लढाई आरंभिली.

१९ परंतु मारवाडचे मोहिमेवर जाण्यापूर्वीं शिंद्यानें हिंदुस्थानचें काम माधवराव फाळके यांजकडे सांगून त्यांचे साहायाकरितां पेरन नामें एका फ्रेंच सरदाराशीं मोठी फौज देऊन त्याची छावणी दुआब प्रांतांत कोयल एथें करविली, आणि आपल्या बरोबर डिबाईनचीं सर्व पलटणें व लखबादादा, जिवबादादा, आणखी आणांतर सरदार, यांच्या फौजा घेऊन त्यांसहवर्तमान मारवाडांतगेला तों जोतपूर वगैरे ठिकाणचे राजे मोठी फौज जमाकरून मेरटा मुकामी लढण्यास सिद्ध होते, सबब शिंद्याचें लष्कर तेथें येतांच मोठें युद्ध झालें. त्यासमयीं मराठे मोठ्या युक्तिनें लढत असतांही रजपुतांपैकीं, चंदावत जातीचे दोनहजार स्वारांनीं मोठ्या शौर्यानें हल्लाकरून डीबाईनचे पलटणांच्या रांगाफोडून त्यांस पसरून दिलें. परंतु ते स्वारजमून परत येत असतां शिंद्याच्या तोफखान्याच्या छऱ्याचे मारानें नाशपावल्यामुळें रजपुतांचे बाकीचे फौजेची दाणादाण होऊन अंतीं शिंद्याचा जय झाला. त्यासमयीं मारवाडांतील मुख्य जोतपूरचा राजा विजे-

शिंग याणें पूर्वींच सन १७५९ चे सालीं जयापा शिंद्यास मारेकरी घालून मारिलें होतें. सबब त्यापासून खंडणी शिवाय, आणखी कांहीं आपल्याकडे अजमीरचाप्रांत लाऊन घेतला, आणि पुढें उदेपूरवाल्यांचे राज्यांत बैदा झाला होता तो मोडण्यास त्या राजांस मदतकरून त्यांकडूनही कांहीं खंडणी घेतली, व याशिवाय, जावध, निमच, रतनगड, खोनी, व बिजपूर हे परगणे शिंद्यास पूर्वीं मिळाले होतेच, त्यांवरही पूर्ण अंमल झाला. यानंतर महादजी शिंदा आपली फौज घेऊन जयपुरासगेला, परंतु तेथील लढाईचें काम आपल्या बरोबर नेलेले सरदार लखबादादा व जिवबादादा यांजवर सोंपून आपण कांहीं फौजेसहवर्त्तमान वकीलमुतलकीची सनद पूर्वीं बादशाहाकडून पेशव्याचे नांवानं घेतली होती, ती सादर करण्या करितां पुण्यास जाण्याचे निमित्तानें उज्जनीस गेला, परंतु मागें ठेविलेल्या सरदारांशीं जयपुरास लढाई होऊन तेथील खंडणी घेतली, आणि महादजी शिंदा गेल्यावर मागें होळकर व शिंदे यांचे फौजेंत कांहीं खंडणी व लूट यांच्या वांटणी विषयीं तंटापडला, तो इतका वाढला कीं, शेवटीं शिंदे व होळकर यांचे फौजेचें मोठें युद्ध लखेरी मुकामीं झालें. त्यांत होळकरानें नवीनच च्विव्हालीयर डुंडरनेक नामें फ्रेंच सरदाराचे हाताखालीं चार पलटणी भरल्या होत्या, त्यांचा डीबाईनचे पलटणांनीं अगदीं नाशकेला, आणि सांगितलेल्या फ्रेंच सरदारास खेरीज करून होळकराचे सर्व युरोपियन सरदार नाशपावले, व डीबाईन याणें होळकरांच्या ३८ तोफा घेतल्या यामुळें शिंद्याचा फ्रेंच सरदार याची बहुतच प्रशंसा झाली. हें युध्ध सन १७९२ त झालें.

१७ महादजी शिंदा पुण्यास येण्याचें कारण, तुकोजी होळकर व अली बाहदर यांस परत बोलावणें होण्या विषयीं प्रयत्न करावा, हें होतें असें पूर्वीं सांगितलेंच आहे. याशिवाय, आणखी एक मुख्य कारण असें होतें कीं, तो सुमारें दहा वर्षें पर्यंत हिंदुस्थानांतच राहिल्या मुळें पुण्याचे दरबारांत नाना फडणविसाचें प्राबल्य अधिक वाढत चाललें, सबब त्यास आपल्या पेक्षां वरिष्ठ न होऊं द्यावें, हा हेतू मनांत धरून पेशव्या जवळ आपण प्रमुख होण्याचे बेतानें उज्जनीहून निघाला. त्याणें आपल्या बरोबर कांहीं फौज घेतली होती; परंतु ती सगळी पुण्यास बरोबर नेली असतां नाना फडणवीस आपणांस भिऊन, आपणांस

अनिष्ठ असे कांहीं उपाय योजील, आणि तेणेंकरून आपला पेशव्याशीं मेळ करून घेण्याचा हेतू सिध्धीस जाणार नाहीं, सबब तो अवघ्या एका पलटणा निशीं सन १७९२ च्या जून महिन्यांत पुण्या जवळ मुळामुठा नद्यांचे संगमा नजिक जाऊन उतरला, आणि तेथून पेशवा व नाना फडणवीस यांची भेट घेऊन वकील मुतलक पदांचीं वस्त्रें पेशव्यांस सादर करण्यास दिवस नेमिला.

१८ महादजी शिंद्यानें जरी आपणांस स्वतंत्र राजा करून घेतलें, तरी तो पुण्याचे दरबारचे संबंधानें रीती व मान राखण्यांत बहुत लक्ष ठेवीत असे, आणि आपण पेशव्यांची रयत असें म्हणवावें, म्हणून दक्षिणेंत कितीएक पाटिलक्या विकत घेतल्या, आणि त्याला, लोकांनीं वाडवडिलार्जित नांव पाटील बावा, तें घेतलें असतां बहुत अनंद होई. आणि आपण पेशव्याचे पदरचा शिपाई आहें, असें निःसंदेह दाखविण्या करितां दिल्लीचा बादशाहा शाहअलम, याचे स्वाधीन झाला तेव्हां वकील मुतलकीचें पद आपल्या नांवानें करून नघेतां त्याची सनद पेशव्यांचे नांवानें करून घेऊन राज्याचा कारभार आपल्या हातांत ठेविण्या करितां त्याचा हस्तक आपण होऊन दिल्लीच्या बादशाहचा कारभार करूं लागला. आणि वकील मुतलकीचीं वस्त्रें देण्याच्या समारंभास माधवनारायण ऊर्फ सवाई माधवराव यांजकडे जेव्हां आला, तेव्हां "जणूकाय," या सरदारानें आपल्या स्वामी भक्तिच्या गुणाची परीक्षाच दाखविली. ती अशी कीं, आग्र्या पासून सतलज नदी पर्यंत देशाचा खरा राजा, रजपूत लोकांस जिंकणारा, एक तृतीयांश माळवा व कांहीं दक्षिणेंतील उत्तम प्रांत यांचा मालक, कवाईत शिकलेलीं सोळा पळटणें पाचशें तोफा, व या शिवाय, त्याचे नेहमीचे स्वार व पायदळ यांचा पुढारी, हा जेव्हां पेशव्याचे गादीवर बसलेल्या मुलास नेमलेल्या दिवशीं, आपण देववीलेल्या वकील मुतलकीचे पदाचा अधिकार सादर करण्यास, मंत्र्यांनीं विराजित अशा राजैश्वर्य प्रदर्शक दरबारास जाऊं लागला, तेव्हां पुण्याचे वेशींत हत्तीवरून खालीं उतरून पुढें दरबारचे तंबुपर्यंत चालत गेला, आणि सर्व मानकऱ्यांचे खालीं बसला, आणि वर बसण्याचा जेव्हां पेशव्यानें आग्रह केला, तेव्हां आपली तितकी योग्यता नाहीं, असें बोलून काखेंतून आणिलेला एक जोडा पेशव्यां पुढें ठेऊन त्यांचे पांयांतील जुना जोडा पुनः आपले कांखेस मारला; आणि

म्हणाला कीं, माझे बापाचा जो धंदा तोच माझा आहे. शिंद्यानें ही अशी नम्रता धरण्याचें कारण असें दिसतें कीं, नाना फडणविसानें पेशव्यास अगदीं प्रति बंधांत ठेविलें होतें, म्हणून आपण त्यास नम्रता दाखविली असतां तो आपल्या कडचा होईल, असें त्यास वाटलें असावें. हा पुढें कांहीं कालपर्यंत वांचता तर त्याणें धन्यास आपल्या कडचीं करून घेतलाच असता. आतां त्या वकील मुतलकीचे पदाचें नाना फडणविसाचे मनांत नसतां, पेशव्यानें कसा स्विकार केला, शिंद्यानें पेशव्यास काय काय वस्ता दिल्या, व नानाची त्याणें प्रथम मर्यादा कशी राखिली याविषयीं एथें तपशीलवार लिहिणें नलगे. इतकें पुरे कीं, त्या दिवशीं दरबारांत महादजीनें आणिलेली बादशाहा कडची पेशव्यांचे नावची सनद वाचून ती पेशव्याचे हवालीं केली, व मुसलमानी राज्यांत गोवध न होण्या विषयीं दुसरी एक सनद होती, ती वाचली आणि पेशव्यानें ही त्या वकील मुतलकीचे सनदेंत लिहिल्या प्रमाणें शिंद्यास आपला हस्तक दिल्लीचा कारभार करण्यास नेमिलें. यापुढें शिंदा पुण्याचे मंडळीस व पेशव्यास गोड भाषणानें रिझवून आपलें प्राबल्य वाढवीत होता. या शिवाय, पेशव्यानें आपणा बरोबर राहवें म्हणून त्याला शिकारीचाही नाद लावला, परंतु तें नानास न आवडून त्याणें उलटयत्न केला तो असा कीं, शिंद्याकडे हिशेब मागून हिंदुस्थानांत संपादलेल्या द्रव्याचाही हिसा मागितला, तेव्हां तें द्रव्य पेशव्याचा मोठेपणा वाढविण्यांत खर्च झालें, म्हणून शिंद्यानें सांगितलें. यानंतर शिंद्याचें सैन्य बळकट व मसलत खोल यापुढें नानाचें कांहीं चाललें नसतें, परंतु इतक्यांत महादजी शिंदा सन १७९४ च्या फेब्रुआरी महिन्याचे बारावे तारखेस पुण्याजवळ वानवडी मुकामी वारला. यालासाहा बायका असून गादीस वारसपुत्र नवता. बाळाबाई नामे एककन्या मात्र होती.

१९ महादजी शिंद्यानें बहुधा कोणाचें राज्य सर्वस्वीं बुडविलें नाहीं, आणि मराठी मंडळांत तसें कोणी करूंलागला असतां त्यासहा प्रतिबंधही करी. राघोबा दादा माळव्यांत आला तेव्हां होळकरांचे घराण्यांतील त्यासमयीं राहिलेली वारस एकटी अहिल्याबाई होती तिला कैदकरून त्या घराण्याचा नाशकरावा असें त्या राघोबाचे मनांत आलें होतें. परंतु महादजी शिंद्यानें आपल्या खास्गांत फौ-

जेची मदत त्या वाईट कामास न दिल्यामुळें तोबेत सिध्धीस गेला नाहीं. हा शत्रूशीं भिडून लढत असतां याचा त्याजवर जोर चालले असें दिसल्यास मात्र आपल्या फौजेचा अनिवार बलात्कार त्याजवर मोकळा सोडी. आणि तेणें करून शत्रू बहुत जेरहोत असे. शौर्याविषयीं याणें सर्व रजपूत राजांचा गर्व हरण केला. आपल्या राज्याचा चांगला बंदोबस्त होऊन प्रजेस सुख व्हावें असें हा इछी, आणि आपल्या नजरे खालचे मुलखांत बहुधा तसा बंदोबस्त ठेवी. परंतु मोंगल व पेशवे यांचा कारभार चालविण्या विंषयीं आपसांत तंटे होऊन जी त्या दोन्हीं राज्यांस निर्बलता आली तिची याणें संधी साधून आपलें राज्य एकाएकीं वाढविलें, सबब त्याचे बंदोबस्तास जे कामदार नेमले, त्यांतून अंबूजी इंगळे खेरीज करून बहुतेकांनीं नवीन घेतलेल्या प्रांतांत आपला पूर्ण अमल बसविण्या करितां रयतेवर जुलूमही केला; यामुळें कित्येक लोक महादजी शिंद्यास जुलमी राजा असें ह्मणतात. अधिकार परत्वें याच्या वागणुकीकडे पाहिलें असतां हसूंयेतें परंतु असें कबूल केलें पाहिजे कीं, त्याचा साधा स्वभाव असल्या मुळें हा राज्याधिकारोत्पन्न, दांभिकपणा व आयुष्य-आराम यां पासून अगदीं अलिप्त राहून त्याणें पोक्त बुद्धिनें राज्याचा कारभार मात्र आपले हस्तगत ठेविला होता. याचाहेतु बहुत करून मराठे लोकांस चाकरीस ठेवण्याचा असे, परंतु याच्या लढाया बहुत करून नर्मदेच्या उत्तरेस झाल्यानें व फौजाही त्याच देशांत भरल्या गेल्यानें रजपूत व मुसलमान हे बहुत चाकर ठेविले गेले. आणि मराठी फौजेंतील भाईचारा जो ऐन लढाईचे वेळीं एकत्र होण्यास मोठा उपयोगीं पडे तो नाहींसा झाला. हा मोठा बोलका असून समय सूचकता हीं याचे आंगीं असत, याचें शरीर स्थूल असे. मार्मिक भाषण करणारे लोक महादजी शिंद्याच्या गुणा विषयीं कांहीं असें ही म्हणतात कीं, हा शाहाअलम बादशाहाचा बाहेरून नम्र चाकर व आंतून कठोर धनी; होळकराचे घराण्याचा निमित्तास मात्र स्नेही, परंतु अंतरीं शत्रू; रजपुत राजांचे मतलब बाह्यातकारें राखणारा परंतु खरोखर शत्रु व जुलूम करणारा, आणि लोकांत आपलें नांव पाटील सांगून राज्यकरणारा होता. इंग्रजांस बुडवावें असें याचे मनांत होतें, आणि लार्ड कार्नवालीस साहेब श्रीरंग पट्टणास पोंचल्यावर हा तेथें स्नेह भावानें गेला होता असें नाहीं. परंतु त्यां विषयीं आपले हेतु सिद्धिस नेण्यास हा वांचला नाहीं.

---

## भाग ५.

महादजी शिंदा यास, त्याणें जमा केलेली फौज व कमावलेलें राज्य, यांचा पुढें धनी होण्यास पुत्र संतान नवतें. त्याचा भाऊ तुकोजी यास मात्र दोनें पुत्र होते. त्यांतून वडील केदारजी, जो दीग एथं वारला, तो निपुत्रीक होता. कनिष्ठ आनंदराव जो ग्वाल्हेरच्या एका लढाईंत जाट लोकां कडून मारला गेला[2], त्याजवर चुलत्याची मर्जी बहुत प्रसंन असे; यामुळें त्याचा पुत्र दवलतराव यास महादजी शिंद्यानें दत्तक घेण्याचें योजिलें होतें. हा मुलगा तुळजापुरास ठेविला होता. महादजी शिंद्यानें आपला अंतकाळ समीप आला असें जाणून त्या मुलास आणावयास पाठविलें, तत्रापि महादजी एकाएकीं वारल्यामुळें त्या मुलाचें दत्त विधान तो जिवंत असतां झालें नाहीं, आणि त्याचें उत्तरकार्यही कोणीएक स्वकुळांतील केदारजी बिन आपाजी शिंदे नामें होता त्याणें केलें. महादजी शिंदा वारल्यावर दवलतराव तिसरे दिवशीं वानवडी मुकामी जाऊन पोंचला. नंतर पुढें तेरावा होऊन चवदावे दिवशीं म्हणजे मिती माघवद्य १० संवत १७५१ तारीख २६ फेब्रुआरि सन १७९४ रोजीं सर्व सरदार लोक यांच्या विचारें व माधवराव पेशव्याचे अनुमत्तें दत्त विधान पूर्वक महादजी शिंद्याच्या त्यावेळीं असणाऱ्या विधवा स्त्रियां पैकीं वडील लक्ष्मी बाई इचे ओटींत दवलतरावास दिलें. यासमयीं त्याचें वय १३ वर्षांचें होतें. दवलतराव दत्तक होतेवेळीं महादजीचे एका स्त्रीनें अडथळा करून आपण एक दुसराच मुलगा घेण्याचि योजना केलीआहे असें म्हणाली, परंतु तिचें कांहीं नचालतां दवलतराव दत्तक होण्याचें कार्य शेवटास गेलें.

२ यामुळास महादजी शिंद्यानें फक्त मोठें राज्यच कमाऊन ठेविलें होतें अ-

---

• सरजान मालकम, तुकोजीस तीन पुत्र, केवनाजी, जोतिबा, व आनंदराव, अशीं त्यांचें नांवें लिहितात व क. ग्रांट, डफ तीच नांवें, केदारजी, रोभोजी, व आनंदराव अशीं लिहितात. रोळोजी हा कोणी एक मानलेला मुलगा होता असें वाटतें.

२ याच समयीं हणवंतराव फाळका मारला जाऊन त्याची बायको सती गेली.

* क. ग्रांट, डफ १५ वर्षांचें लिहितात.

सें नाहीं, तर त्याचे रक्षणास मोठी फौजही तयार करून ठेविली होती. यामुळें मराठी मंडळांत त्याचें प्राबल्य विशेष दिसूं लागलें, आणि हा प्रमुख झाला. हिंदुस्थानांत ज्या राज्याची स्थापना त्याणें केली होती त्यांत माळवा हा एक लहानसा भाग होता, आणि त्याच्या फौजेचा मुख्य खर्च त्याच्या वसुलावर व रजपुतांपासून वसूल केलेल्या खंडणीवर भागत असे. याशिवाय मल्हारराव होळकर वारल्यावर त्या घराण्यास जयपूरचे उत्तरेकडील देशाचे खंडणीचाहिसा अगदीं मिळेनासा झाला. त्या हिशावर होळकराचा वारसा जरी असे तरी त्याचें रक्षण करण्यास त्यास सामर्थ्य नाहींसें होऊन केवळ भाईचाराच्या योगानें. महादजी शिंद्याचे उत्तर वयांत तो हक्क राखला गेला होता. हा भाईचारा मराठी लोकांत ऐन लढाईचे वेळींही विसरला जात नसे. आणि जेव्हां या लोकांमध्यें आपसांत लढाई होऊन तिचा शेवट होतो, तेव्हां जा लोकांस त्या मंडळीचे गुण व नियम माहित नसतात. त्यांस त्या लोकांविषयीं मोठा चमत्कार वाटतो अगदीं निराळे असतांही एकत्र होण्यास हा भाईचारा उपयोगींपडतो म्हणून महादजी शिंदा बहुत नुकसान सोसूनही त्याचें रक्षण करीत असे.

३ दवलतराव शिंदा गादीवर बसल्या नंतर पेशव्यानें निजामाकडे मागील देण्या घेण्याच्या तोडजोडी करितां वकील पाठविले होते, तो तंटा न तुटून शेवटीं निजामाचा दिवाण मशरुल मुलुक हा नाना फडणविसास आपल्या भरकचेरींत कांहीं अमर्याद भाषण बोलिला त्यावरून उभय पक्षीं लढाईची तयारी झाली. त्या समयीं नानाफडणवीस याणें दवलतरावास लढाई करण्या करितां आपणा बरोबर येण्यास निमंत्रण केलें. यापूर्वी म्हणजे महादजी शिंदा व नाना यांचें वांकडें आलें होतें, तेव्हां महादजीनें उत्तरेकडून कांहीं फौज पुण्या जवळ आणून ठेविलीच होती व यासमयीं आणखी पेरन वगैरे सरदार यांची फौज बोलाऊन शिंद्यानें आपली खासगत पंचवीस हजार फौज जोडली त्यांत दहा हजार पलटणी लोक होते. आणखी दुसरे सरदारांची व खासगी पेशव्यांची मिळून एकंदर एकलक्ष तीस हजार फौज जमली त्या सर्वांचा अधिकार परशुरामभाऊ पटवर्धन यांस मिळाला. ही निजामावर जाणारी पेशव्यांची फौज सन १७९५ च्या जानेवारी महिन्यांत पुण्याहून निघाली. निजामाचीही सुमारें सवालक्ष फौज

यापूर्वीच आपला तळ सोडून बेदरा वरून मराठ्यांचे मुलुखांत संचार करण्यास निघाली ती मोंगी घाटाजवळ येऊन तो घाट उतरत असतां त्याजवर मराठ्यांचें लश्कर, जें त्यासमयीं खर्ड्यां जवळ पोंचलें होतें त्यांतील एक टोळी हरिपंत फडक्याचा मुलगा बाबुराव याजं बरोबर देऊन तारीख ११ मार्च रोजीं शत्रूवर पाठविली, परंतु विशेष त्यापासून फायदा न होतां निजामाचा कांहींसा नाश झाला इतक्यांत या टोळीस परत यावें लागलें, तितक्यावरूनच निजाम आपला जय झाला असें समजून त्याणें त्यादिवशीं खर्ड्यास मुकाम केलें, आणि दुसऱ्या दिवशीं परिंड्याकडे जातअसतां मराठी लश्कर त्याचे दृष्टीस पडलें; तेव्हां त्याणें आपलें सर्व बुणगें डाव्याबाजूस घेऊन एका असतखान नामें सुरदारा बरोबर १७ सत्रा पलटणी देऊन त्यास मराठी फौजेकडे पाठविलें. तेव्हां परशुराम भाऊनें पेशवे व होळकर यांची फौज आपणाकडे घेऊन डाव्या बाजूस शिंदा व उजव्या बाजूस भोसला असा बंदोबस्त करून बाबुराव फडका व काशी राव होळकर यांस बरोबर घेऊन थोडक्या निवडक फौजेनिशीं शत्रू कशा बेतानें चालून येतात हें पाहण्या करितां पुढें गेला तों लालखान नामें कोणी बलोची सरदार याज बरोबरची पठाणाची एक टोळी येऊन त्याजवर पडली. तेव्हां मोठें युद्ध होऊन त्या लालखानानें परशुराम भाऊस जखमी केलें, त्यावरून त्याचा मुलगा हरिपंत याणें आपले बापाची ती अवस्था पाहून त्या लालखानावर अगदीं तुटून पडून त्यास ठारमारलें. तथापि ते पठाण लोक युद्ध करितांना थांबेनात सबब ती मराठी फौजेची टोळी मोठ्या लश्करांत परत आली. त्यासमयीं या फौजेचा इतका घोटाळा झालाकीं, पेशव्याचा जरीपटका वाळगणारा बाबुराव फडका तोही पाठ दाखऊन पळण्यास सिद्ध झाला. तेव्हां शिंद्या कडील सरदार जिवबादादाबक्षी याणें त्याजपाशीं धांवत जाऊन त्याला तुच्छ करून म्हटलें कीं, अरे भित्र्या छिः जर तुला निरमळ जागा पाहिजे तर शिंद्याच्या पलटणाच्या मागें उभा राहा; त्यावरून मग अंमळ स्थीरता झाली. इतक्यांत त्या दोन्हीं फौजांतील पलटणें परस्परांचे आंगावर चालून तीं गोळीच्या टप्यांत आलीं, आणि बहुत निकरानें लढूं लागलीं. परंतु निजामाच्या पलटणीचे मदतीस आलेल्या स्वारांवर भोसल्यानें बाणाची वृष्टी केली व याच समयीं शिंद्या

कडील पेरन नामें फ्रेंच सरदारानें एका टेकडीवर मोठ्यात्वरेनें छत्तीस तोफा चढऊन त्याच स्वारांवर अग्निचा मार चालविला, त्या योगें ते स्वार पळाले. तत्रापि ते पलटणी लोक शिंद्याचे पलटणाशीं लढतच राहिले होते. इतक्यांत निजामानें खर्ड्या कडे जाण्यास निघून त्या पलटणासही मागें फिरण्याचा मोठ्या निकरानें निरोप पाठविला. त्यामुळें ते पलटणी लोक परत गेले आणि त्यादिवशीं दवलतराव शिंद्यास जय मिळाला.

४ या नंतर पुढें त्या लढाई विषयीं काय झालें हें शिंद्याचे इतिहासांत सांगणें जरूर नाहीं, इतकें पुरेकीं याजयामुळें नानाफडणविसास दवलतराव शिंद्याचें अगत्य अधिक पडूं लागलें, आणि पुण्यास परत आल्यावर त्याला हिंदुस्थानांत जाण्याची परवानगी मिळाली.

५ या नंतर दवलतराव शिंद्याचा दक्षिणेमध्यें दुर्गाबाई व रखमाबाई म्हणून कन्यां होत्या त्याशीं विवाह समारंभ होऊन तो उज्जनीस आला; आणि तेथून पेरन साहेबास हिंदुस्थानांत त्याचे छावणींत पाठऊन इतर राजां जवळून खंडण्या वसूल करून मुलखाच्या बंदोबस्तांत तो व त्याचे कारभारी गुंतले असतां पुढील अकटोबर महिन्यांत सवाईमाधवराव पेशवा माडीवरून उडीटाकून तारीख२८सावी रोजी मृत्युपावला. त्यावेळीं पुढें धनी कोण करावा याचा विचार करण्या करितां नानाफडण विसानें शिंद्यास बोलाविलें. आणि त्यास आपला पक्षपाती करून इतर सरदारां प्रमाणें त्यासही आपला विचार बाजी रावास पेशव्याचे गादीवर न बसवितां मयत माधवरावाची स्त्री यशोदाबाई इचे ओटींत कोणी मुलगा देऊन त्याचे नांवें राज्य चालविण्याचा सांगितला. आणि ही गोष्ट रुचण्या करितां बाजीराव आपल्या बापा प्रमाणें इंग्रजांशीं स्नेहकरून पेशव्यांचे राज्यास विघ्न आणील असें कारण दाखविलें. तेव्हां त्या गोष्टीस सर्व सरदार मान्य झाले, आणि त्या प्रमाणें ठराव पत्रही झालें, परंतु या गोष्टीस एकटा बाळोबा तात्या नामें शिंद्याचा मुख्य दिवाण याणें मात्र विपरीत बोलून बाजीरावास धनी करण्याचा पक्ष धरिला. तथापि नानाचा बेत सिद्धिस जाण्या करितां शिंद्याचा एक दुसरा कारभारी जिवबादादा बक्षीनामें होता तो ह्मणाला कीं, आपला धनी शिंदा तो एव्हां लहान आहे सबब तत्पक्षीं मंडळीचें बोलणें त्या मसलतींत जमेस धरण्या सारखें

नाहीं. बाकी इतर सरदार सांगतील तें खरें. अर्थात या दुटपी बोलण्यानें त्याणें आपलें मत नानाच्या मसलतीस दिलें.

६ यापुढें दत्तक कोण द्यावा हें ठरणार इतक्यांत बाजीरावानें बाळोबातात्या नानास प्रतिकूळ ह्मणून त्याशीं पत्र व्यवहार चालविला, व जिवबादादाबक्षी त्याच समयीं वारला त्याचे अंतकाळीं आपला धनी शिंदायास जवळ बोलाऊन मत्येवेळीं सांगितलें कीं, बाळाजी विश्व नाथाचा प्रत्यक्ष वंश असतां आपण दत्तक घेण्याचें अनुमत्त दिलें येणें करून चित्तास बहुत खेद झाला. या भाषणा वरून आपला बेत सिद्दिस जात नाहीं, असें वाटून पुष्टीकरणार्थ मशरुल मुलुक नामें निजामाचा दिवाण खड्यांचे लढाईचे अंती झालेल्या तहाप्रमाणें कलमें अमलांत येण्या करितां निजामानें पेशव्याकडे ओलीस दिला होता त्याशीं नानानें बोलणें लाविलें कीं, आपला पक्ष स्थापण्यास जर तूं या समयीं मदत करशील तर निजामाकडे जें कांहीं पेशव्याचें येणें आहे तें सर्व माफ करून तुझी ही मुक्तता करितों. त्यावरून त्याणें हैदरा बादे कडून कांहीं फौज मागविली. या नंतर बाजीरावानें शिंदा अनुकूळ करून घेतला, आणि आपणास त्याणें गादीवर बसविलें असतां त्या कृत्यास लागेल तो फौज खर्च व चार लक्षांची जाहागीर देण्यास कबूल झाला आणि दवलत रावानें ही त्या गोष्टीस रुकार दिला.

७ हें वर्तमान नानानें ऐकतांच त्यांत आपली मानाचीच केवळ नाहीं परंतु जिवाची ही हानी समजून परशुराम भाऊ पटवर्धन त्यासमयीं तासगावांस होता त्यास त्याचे सर्व फौजेनिशीं बोलाविलें. तो आल्यावर उभयतांचे मसलतीनें ठरलें कीं बाळोबा तात्या व शिंदा यास न विचारतां बाजीरावास आपणच गादीवर बसऊन त्याजवर उपकार करावे म्हणजे तो आपणास प्रतिकूळ राहणार नाहीं. यावरून परशुराम भाऊ शिवनेरीस बाजीराव कैदेंत होता तेथें गेला, आणि बाजीराव प्रथम त्यागोष्टीस अटकाव करीत असतां त्यास कांहीं दगा नसण्याची त्या भाऊनें आणभाक देऊन त्याचा कनिष्टबंधू चिमणाजी आपा व हा या उभयतांस पुण्यास आणिलें.

८ ही गोष्ट बाळोबा तात्यास विचारून जर त्यांणीं केली असती तर त्यागोष्टीस त्याचें ही अनुमोदन होतेंच. परंतु नानानें वर्चस्व पणा दाखविण्या करितां

दुसऱ्यानें स्थापलेली गोष्ट आपणच करून दाखऊन त्याला राग येईसें केलें. ते- व्हां तो ह्मणाला कीं, आपण करणार ती गोष्ट दुसऱ्यानें केली, सबब ती सिद्धिस जाऊंदेणार नाहीं. या नंतर आपला धनी जो त्या समयीं गोदातीरीं होता त्यास समजाविलें कीं, बाजीराव दूसऱ्याचे सहायानें गादीवर बसणार यांत आपल्यास जी चार लक्षांची जाहागीर मिळणार होती त्याचें नुकसान होतें, तेव्हां त्या शिं- द्यानें आपला मतलब साधण्या करितां पुण्याकडे मोठीफौज चालती केली. या समयीं नाना व बाजीराव यांचा स्नेह होऊन बाजीरावानें धनीपणा चालवावा व नानानें कारभार पाहवा असें ठरलें होतें. परंतु शिंदाचढून आला हें आपणास अनिष्ट कारक तशांत बाजीरावाचा ही पक्का भरंवसा नाहीं असें पाहून त्याणें बाजी रावास परशुराम भाऊचे हवालीं करून आपण नव्या पेशव्यास वस्त्रें आणण्यास जाण्याचे निमित्यानें साताऱ्यास गेला. मागें बाळोबातात्या येऊन त्याची व बा- जी रावाची भेट झाली. परंतु तो बाजीरावाचा पक्ष धरण्यास कबूल होईना. त्या- णें एक निराळीच मसलत परशुरामभाऊशीं केली, ती अशी कीं बाजीरावास कैद करून त्याचा कनिष्टबंधू चिमणाजी आपा यास यशोदा बाईस दत्तक देऊ- न पेशव्याचा कारभार परशुराम भाऊनें पाहवा. या गोष्टीस बाजीराव आपल्या कैदेंत राहील असें समजून नानाफडणवीस ही आपलें मत देण्यास कबूल झाला, आणि साताऱ्याहून नव्या पेशव्याचे नावानें वस्त्रें घेऊन पुण्यास यावयास निघा- ला तों त्यास कळलें कीं, बाजीराव शिंद्याचे स्वाधीन आहे. तेव्हां त्याशीं व बाळो- बातात्याशीं कांहीं स्नेह ही झाला असावा, असा कांहीं संशय येऊन तो माघारा परतला आणि नुसतीं वस्त्रें मात्र पाठऊन दिलीं.

९ बाजीराव शिंद्याचे हवालीं झाला तीगोष्ट अशी झाली कीं, बाळोबातात्या व परशुरामभाऊ यांची मसलत झाल्यावर एके दिवशीं शिंद्यानें बाजीरावास फौ- जखर्चाचे जबाबाविषयीं बोलण्याचे निमित्यानें आपले डेऱ्यांत बोलाविलें, आणि त्यास बोलण्याचे नादांत संध्याकाळ पर्यंत बसऊन ठेविलें. इतक्यांत परशुराम- भाऊ व बाबूराव फडके यांणीं बाजीरावाचा कनिष्टबंधू चिमणाजी आपा यास पु- ण्यातच लपवून ठेऊन त्यांणीं त्यास साताऱ्याकडे नेलें अशीखोटी खबर बाजी- रावाचे कानीं जाई असें केलें ही खबर त्याणें ऐकतांच तो शिंद्यास ह्मणूं लागला

कीं, रात्रीचे प्रहरीं पाटलाग करणें उपयोग नाहीं. नंतर बाजीराव त्या दिवशीं तें- थेंच राहून दुसऱ्या दिवशीं बाहेर जाऊं लागला असतां शिंद्याचे शिपाई त्याला जाऊं देईनात. तेव्हांच तो आपल्यास दगा झाल्याचें समजला.

१० इकडे चिमणाजीआपास पळविणाऱ्या मंडळीनें दुसऱ्या दिवशीं तो आपल्या भावावांचून राजी नसतांवळेंच त्यास तारीख २६ मे सन १७९६ रोजीं पेशव्याचे पदावर बसविलें, आणि बाळोबा तात्यानें कारभार करण्याकरितां परशुरामभाऊचे मार्फत नाना फडणविसास त्याचा सूड घेण्या करितां कृत्रीमानें बोलावणें पाठाविलें. परंतु तो साताऱ्याहून येत असतां बाजीराव शिंद्याचे हवालीं झाल्याचें ऐकून पुढें आला नाहीं हें मागें लिहिलेंच आहे. परशुरामभाऊनें नानास बोलावणें पाठवीलें तेव्हां त्याणें उलट सांगून पाठविलें कीं, कांहीं बोलावयाचें आहे या करितां आपलापुत्र हरिपंत याजला मजकडे पाठवावा त्यावरून तो तिकडे रवाना झाला. परंतु वकीलाप्रमाणें एकटा न जातां हजार स्वारांनिशीं आपला अंतस्थ मतलब साधावया करितां गेला. परंतु नानाचा मित्र बाबूराव फडका याणें त्याला त्याविषयीं हुशार केलें, तेव्हां नानाफडणवीस साताऱ्याहून पळून खालीं कोकणांत महाडावरून रायगडास गेला, यापुढें बाळोबा तात्यानें नानास पकडण्या करितां कांहीं पलटणें पाठविलीं होतीं परंतु तोबेत सिद्धिस नजातां बाजीराव व नानायांचा स्नेह दृढ होण्यास मात्र तें कारण झालें.

११ परशुरामभाऊ पुण्यांत कारभार करूं लागल्यावर शिंद्यास फौजखर्चाची मोटी अडचण पडली ती दूर होण्या करितां त्या उभयतानीं मिळून निजामाचा दिवाणमशारुल मुलुक, जास नानानें आपल्या मतलबाकरितां सोडून देण्याचें कबूल केलें होतें, त्यास तोबेत सिध्धीस गेला नाहीं, म्हणून निजामानें करार केलेल्या ऐवजापैकीं चौथाई घेऊन सोडून देण्यास कबूल झाले आणि त्या ऐवजाची तोडजोड करण्याकरितां त्यास मोकळा केला.

१२ या नंतर पुढें बाजीराव व नानाफडणवीस यांमध्यें बाळोजी कुंजराचेद्वारें पत्र व्यवहार चालूझाला, आणि पुढें नानानेंही महानमहान मसलती योजिल्या त्या अशा, प्रथम पेशव्याची खासगी फौज व तिचा अधिकारी बाबुराव फडका तो याणें वशकेला. तसाच तुकोजी होळकरही आपलासा केला. या शि-

वाय शिंद्याच्या दरबारांत बाळोबातात्याचा प्रतिपक्षी रयाजीपाटील नामें दुसरा सरदार असे त्याचे हातीं शिंद्यास निरोप पाठविला कीं, जर बाळोबातात्यास कैद-करून बाजीरावास गादीवर बसण्यास मदत कराल तर तुह्मास हिंदुस्थानांत जा-तेसमयीं पटवर्धनाची सर्व जाहागीर व अहमंदनगरचा किल्ला, तसाच आणखी दहालक्षांचा मुलूख इतकें देऊन दुसरी एक निःसंदेह लागू पडण्याजोगती अ-शिमसलत योजिली कीं रयाजीपाटलाचेच तर्फेचा सखाराम घाडगा नामें काग-ल कराचे वंशांतील असे. त्यास एककन्या जीपुढें बायजाबाई साहेब नांवानें प्रसि-द्धिस आली ती बहुत रूपवती असे, तिजला वरण्याचा दवलतरावाचा बहुत हेतू होता, सबब त्यास आपल्या कडचा करून आपला बेत सिद्धिस नेण्यास तें एक द्वार करून ठेविलें. परंतु त्यांतून कांहीं वर्तमान बाहेर फुटून तें बाळोबातात्यास कळल्यामुळें त्याणें तेचक्षणी बाबुरावफडक्यास कैदकेलें, आणि निळकंटरावपरभू व मालोजीघोरपडे यांस धरावयाला पाटविलें असतां ते आपल्या कांहीं लोकांसह पळाले ते वाईकडेगेले, त्यांज बरोबर नानानें मानाजीफांकड्यास मदतीस देऊ न त्यांस सालप्याच्या घांटाकडे पाठविलें. तेथें त्यांस वजावा शिरोळकराची कु-मक मिळून तें लश्कर बाजीरावास गादीवर स्थापण्यास जमाझालें अशी अ-वाई उठली.

१३. लोकांत या फौजेची बोलवा प्रगट झाल्यावर बाजीराव व नाना यांमध्यें महान् महान मसलती चालल्या होत्या त्या, आणि मुख्यत्वेंकरून सखारामघाडगा-ही त्यांणीं आपल्या पक्षाचा करून घेतला आहे, हें बाळोबातात्यास कळलें नाहीं आणि त्या फौजेची वार्ता उठण्याचें मूळकारण, बाबाजीराव. त्यास सखारामघाड-ग्या बरोबर हिंदुस्थानांत पाठविला ह्मणजे पुरे असेंसमजून त्याणें तसेंचकेलें. तो घाडगा थोडेलोक बरोबरघेऊन बाजीरावाबरोबर हिंदुस्थानांत चालला. ते प्रव-रानदीचेकांठीं जात तांपर्यंत त्या दोघांचें एकचित्त झालें, आणि घाडग्यानें बा-जीरावास सांगितलें कीं, शिंद्यानें तुह्मांस गादीवर बसवावें ह्मणून मी त्यास आप-ली मुलगी देऊंकेली आहे, व आणखी ही लागेलती मदत करण्यास मी सिद्ध-आहें, परंतु हें काम सिद्धिस गेलें असतां कागलगांव इनामदेऊन मला शिंद्या-चामुख्य कारभारी करावें, व याशिवाय शिंद्यास दोनकोटी रुपये अंतस्त देऊं-

केलेपाहिजेत, तेव्हां बाजीरावानें तें सर्व कबूलकेलें; आणि आजारीपणाचें सोंगघेऊन ते दोघेही तेथेंच राहिले.

१४ इकडे नानानें मशारुल मुलुकाचे द्वारें निजाम वश करून त्याची फौज पुण्याजवळ आणून कांहीं परशुराम भाऊचे मुलखांत धुमाळी करण्या करितां पाठविली. व याशिवाय आणखी महान महान मसलती केल्या त्या सर्वांचें फळ हेंच झालें कीं, अंतीं शिंद्यानें बाळोबा तात्यास कैद केलें. तेव्हां लागलाच परशुराम भाऊही अकटोबरच्या २७ व्या तारखेस चिमणाजी आपास घेऊन शिवनेरी किल्यास गेला. परंतु तेथेंही तो पकडला जाऊन आनंदराव रास्त्याचे स्वाधीन झाला, आणि पुढें दिसंबरचे २७ वे तारखेस सातान्याहून नवीन वस्त्रें घेऊन बाजीरावास पेशवे पदाचा अभिषेक झाला, आणि सर्व सरदारानुमतें नाना फडणवीस पुनः कारभार करूं लागला, व शिंद्यास अहंमद नगरचा किल्ला व त्याजवळचा सहालक्षांचा मुलूख देऊन परशुराम भाऊची जाहगीर हस्तगत होत जाईल तसतशी स्वाधीन करणें कबूल केलें.

१५ याप्रमाणें पुण्याचे दरबारांत स्थीरता होणार यापूर्वींच होळकराचे घराण्यांत कलह उत्पन्न झाला, त्यायोगें दवलत रावास तिकडे ही मन घालावें लागलें. तो प्रकार असा कीं, तुकोजी होळकर मागील आगष्ट महिन्याचे पंधरावे तारखेस मारला. त्याला काशीराव व मल्हारराव असे दोन औरसपुत्र, व या शिवाय यशवंतराव व विठोजी असे दोन दासी पुत्र होते त्यांत काशीराव अप्रयोजक, व मल्हारराव शूर व सूज्ञ असे. त्या दोघां सख्या भावांत तंटा उद्भवला. तेव्हां मल्हारराव आपल्या दोघां दासिबंधू सहवर्तमान बापाचे लश्कराचा तळ सोडून पुण्या जवळा भामवडे मुकामीं येऊन राहिला. त्यास नाना फडणवीस आपले मतलबा करितां आंनून सहाय असे. अशा प्रसंगीं त्या बंधूंचा मोड करण्या करितां काशीरावानें शिंद्याची मदत मागितली. ती त्याणें दिल्यावर त्याचे सहायानें आपल्या बंधूशीं लढाई केली, त्यांत मल्हारराव मृत्यु पावला व त्याचा मुलगा कैद झाला. याशिवाय दोघे दासी बंधूंतून यशवंतराव नागपुरास व विठोजी कोल्हापुरास जाऊन ते आश्रय धरिते झाले.

१६ बाजीराव पुण्याचे गादीवर स्थापित झाल्यावर शिंदा व नाना यांपासू-

न ही आपण स्वतंत्र होण्याची इच्छा करूं लागला. त्यांतून त्याला असें वाटलें कीं, शिंदा कधींतरी हिंदुस्थानांत जाईलच. परंतु नेहमीचा स्थाईक जो नाना फडणवीस त्या पासून आपणास अगदीं सुटका मिळण्या करितां त्यास कैद करण्याची योजना केली पाहिजे. तो बेत त्याणें असा योजिला कीं, सखाराम घाडग्याचे नांवास राजेंराव हें पद जोडिलें, आणि त्यास सांगितलें कीं, करारा प्रमाणें मी तुम्हांस शिंद्याचा मुख्य कारभारी करणार, परंतु त्यास नाना फडणवीस अटकाव करितो त्या पुढें माझा इलाज नाहीं. जर तुम्ही त्यास कैद करण्यास सहाय व्हाल तर तुम्हास शिंद्याचा सहज कारभार मिळेल, त्यावरून नाना व घाडगा यांचा बेबनाव होऊन त्याणें त्या नाना विषयीं शिंद्याचे मनांत कुकल्पना आणिली, आणि एकेदिवशीं नाना शिंद्याच्या भेटीस तारीख ३१ दिसेंबर सन १७९७ रोजीं गेला असतां त्याजला कैद करून अहमदनगरचे किल्यावर पाठऊन दिलें. त्याच समयीं बाजीरावानें नानाच्या पक्ष पाती लोकांस आपणाजवळ कांहीं कामाचे निमित्तानें बोलाऊन कैद केलें, आणि इतकें होतांच त्या दुष्ट घाडग्यानें पुण्याची एकदम नाकेबंदी करून लुटालूट, तोडा तोडी, मारामारी, गोळ्यागोळी, हीं बहुत निर्दय पणें करऊन तेच दिवशीं मराठ्यांची मुख्य राजधानी पुणे शहर हें अहोरात्र रक्तानें धुतलें, आणि आपण जो पुढें शिंद्याचा कारभार करणार त्याच्या प्रकारची लोकांस वानगी दाखविली.

## भाग ६.

सन १७९८ च्या मार्च महिन्यांत दवलतगावराव शिंद्यानें पूर्व करारा प्रमाणें सरजेराव घाडग्याची कन्या वरिली, आणि तिला बायजाबाई असें म्हणूं लागले. या शिंद्याचें हें तिसरें लग्न होय. आणि ही कन्या शाहणी, सद्गुणी, सुशील, सशीच लावण्यरुपवती असे. यामुळें दवलतराव तिजवर बहुतच मोहित झाला होता, आणि त्या आवडीच्या लग्न समारंभास त्याणें इतका खर्च केला कीं, त्याजला पुढें थोडक्याच दिवसांत फौज खर्चाचे विवंचनेंत पडावें लागलें. ही विवंचना दूर होण्या करितां दवलतरावानें बाजीरावा पाशीं, त्याणें घाडग्याचे मार्फत गादीवर बसविण्या करितां अंतस्थ देऊं केलेले, दोन कोटी रुपये मागितले. तेव्हां बाजीरावाजवळ तितका पैसा नवता व सरजेराव घाडग्यास तर शिंद्याचा कारभार देवविणें होता, यास्तव त्याणें त्यास सांगितलें कीं, दोन कोटींचा करार पुरा करण्यास तूर्त अनकुलता नाहीं, त्यास तुम्हीं जर सरजेराव घाडग्यास आपला मुख्य कारभारी कराल तर तो व आपणा कडील बाळोजी कुंजर यांचे माहितीनें पुण्यातील कांहीं द्रव्य काढतां येईल. घाडगा त्या समयीं नवीनच आवडता सासरा झाला होता, आणि तशांत बाजीराव आपला धनी, तो त्याची शिफारस करतो, व आपल्या दरबारांत बाळोबा तात्यास कैद केल्या मुळें मुख्य कारभाऱ्याची जागा खाली, सबब दवलतरावास तें बाजीरावाचें म्हणणें बहुतच रुचलें; आणि त्याणें घाडग्यास आपला मुख्य कारभारी केलें. यानंतर घाडगा व कुंजर यांणीं, बाजीरावानें नानाच्या ज्या पक्षपाती लोकांस कैद केलें होतें, त्यांकडे जाऊन त्यांस, व पुण्यातलि आणखी सभ्यव सावकार लोकांस धरून आणून द्रव्य हरण करण्या करितां अनिवार दुःखें दिलीं, आणि यांतच गंगाधर पंत भानू नामें नानाचा भाऊ होता त्याला तापलेल्या तोफेवर द्रव्य दाखविण्याकरितां बांधिलें त्या योगें तो मेला. या अविचारी व दुष्ट कृत्या मुळें सर्व लोक बाजीराव व घाडगा या दोघांचाही तिरस्कार करूं लागले.

१ घाडगा पुण्यातील लोकांस इतकी पिडा देईल असें बाजीरावास प्रथम

वाटलें नवतें, व हें अंतस्थ देऊं केलेल्या दोनकोटि रुपयांचें वर्तमान नानाच्या पाठीमागें बाजीरावानें केलेला आपला मुख्य कारभारी अमृतराव यास माहित नवतें, यामुळें तोही त्या अनर्थाकडे पाहून बहुत रागावला. तेव्हां बाजीरावानें त्या घाडगे कृत अनर्थाचें गाऱ्हाणें शिंद्या जवळ करून त्याजला दूर करण्या विषयीं सांगितलें, परंतु ती गोष्ट तो ऐकेना तेव्हां बाजीराव व त्याचा भाऊ अमृतराव यांणीं शिंदा व त्याचा कारभारी सासरा यास सर्वलोक बहुत कंटाळले आहेत असें पाहून त्यांस कैद करण्याची मसलत केली, आणि तो पेशव्याचे भेटीस आल्यावर पेशव्याच्या पलटणीचा सरदार आबा काळे यांणीं खुणे सरसा कैद करावा असें ठरलें. त्या प्रमाणें शिंद्यास एके दिवशीं आपल्याकडे बोलाऊन आणून धनीपणाचे नात्यानें धमकाऊन सांगितलें कीं, पुण्यांतील लोकांस तुझा बहुत उपद्रव होतो त्यास तूं हिंदुस्थानांत निघूनजा, तेव्हां दवलतराव आपणास दगा आहे असें समजून बहुत नम्रतेनें बाजीरावास विनविता झाला कीं, माझ्या फौजेचें चढलेलें वेतन त्यांजला देण्यास मिळतांच मी एथून जातों. त्याच समयीं अमृतरावानें पूर्वींचे मसलती प्रमाणें करण्याची बाजीरावाची आज्ञा मागितली. परंतु ती त्याणें त्यास दिली नाहीं इतकेंच नाहीं, पण पुढें कांहीं दिवसांनीं त्या मसलतीची सर्व हकीकत शिंद्यास सांगितली, आणि अमृतराव व शिंदा यांमध्यें वांकडें पाडलें. येणें करून तो लोकांत मित्रा व मसलतीचा कच्चा या लांच्छनास पात्र झाला.

२ या धमकावणी बद्दल दवलतरावानें बाजीरावाचा सूड उगविला असता, परंतु गृह कलहाच्या योगें तो स्वतांच बहुत अडचणींत पडल्यामुळें तसें झालें नाहीं. तो प्रकार असा—महादजी शिंदा वारला ते समयीं त्याच्या तीन बायका जिवंत होत्या. त्यांचा दवलतराव सर्व तऱ्हेनें मान रक्षून खर्च चालवीत असे असें असतां त्यांत कांहीं न्यूनता पडली ती गोष्ट त्या बायांनीं पूर्वी पारद्वेष संबंधाच्या योगानें शिंद्यास न कळवितां लोकांत प्रसिद्ध केली, ती अशी कीं, त्यांतून धाकटी जी भागीरथीबाई ती बहुत स्वरूपवान व तारुण्यावस्थेंत आहे तिजवर दवलतराव वाईट भावानें जबरदस्ती करूं पाहतो. त्यासमयीं शिंद्यानें सरजेरावास त्यांच्या समजुती करितां पाठविलें. त्यावरून तो त्या बायांकडे गेला असतां

त्या, याची भेट घेईनांत तेव्हां या उद्धट, व निर्लज्ज पुरुषानें त्या गतभर्तृका अबला, ज्यांच्या भ्रताराच्यासमोर असे कितीएक सरजेराव तुच्छ झाले असते, व त्याणें कमावलेल्या राज्याचा कारभार, त्याचे अविचारी, कामातुर, व लेंकुर बुद्धि दत्तक पुत्रास आपली कन्या देऊन करूं लागला. हा त्या बायांचे डेऱ्यांत आपण जबरदस्तीनें स्वतां घुसून त्या अनाथ व अनाश्रित स्त्रियांस फरफरां बाहेर ओढीत आणून निर्दय हृदय करून कटोर हस्तानें चाबुकाचा मार देऊन त्या राजपत्न्यांचा अपमान करिता झाला.

४ महादजी शिंद्याचे कारकीर्दीत मुख्य कारभार व दुसरीं बहुतेक वजनदारीचीं कामें शेणवई लोकांकडे असत. परंतु दवलतरावानें बाळोबातात्यास कैद केल्या नंतर सरजेरावास मुख्य कारभार सांगितला, यामुळें त्या लोकांचें तादृश वजन शिंद्या जवळ राहिलें नाहीं. आणि त्या सर्वांनीं आपल्या पहिल्या मालकिणीचा पक्ष धरिला. तेव्हां दवलतरावानें नाइलाज होऊन त्या बायांच्या माना प्रमाणें खर्चास देऊन त्यांस बऱ्हाणपुरीं राहूं देण्याचें कबूल केलें, आणि त्या प्रमाणें तिकडे जाण्या करितां सन १७९८ मे महिन्याचे १४ वे तारखेस कांहीं स्वार बरोबर देऊन रवाना केल्या. परंतु त्या कोरेगाव पर्यंत पोंचल्या नाहीं इतक्यांत पुण्यांत वदंता उठली कीं, अहमद नगरचे किल्यांत बंदींत घालण्या करितां त्यांजला नेलें त्यासमयीं त्या शेणवी लोकांनीं त्यांजला सोडऊन आणण्या करितां शिंद्याचेच स्वारांपैकीं स्वपक्षाचा मुजफरखान नामें सरदार असे त्याला त्याचे स्वारांच्या टोळीनिशीं पाठविलें. त्याणें शीघ्र गतीनें जाऊन त्या बायांस तेथून सोडवून परत पुण्यास आणिल्या. याकृत्याचा सरजेरावास रागयेऊन त्याचा पाठलाग करण्याची त्यानें शिंद्यापासून परवानगी घेतली. तेव्हां मुझफरखानानें त्या बायांस अमृत रावाकडे भिमेचे तिरीं पाठविल्या, आणि घाडगा आपल्या पाठीस लागला असतां त्याजवर आपण उलटून पडून त्याचा युद्धांत पराभव करून विजयी होत्याता पुनः बायांकडे गेला. यापुढें अमृतरावाचे लश्करावर छापा घालण्या करितां शिंद्यानें पांच पलटणें नेमिलीं होतीं, परंतु तो बेत न साधतां यत्न वायां गेला.

५ यापुढें शिंद्यानें त्या शेणवी लोकांचे मार्फत पुनः कबूल केलें कीं, त्या बाया कोठेंही राहिल्या तरी आपण त्यांस त्यांच्या माना प्रमाणें खर्चास देऊं. स्वा-

वरून अमृतराव विश्वास पूर्वक त्या बायां सहवर्तमान खडकीच्या पुलाजवळ येऊन राहिला. परंतु पुढें मोहरममहिना आला त्यासमयीं अमृतरावाचे लोक शिंद्याचे वचनाचा व्यर्थ भरंवसा मानून विनहत्यार ताबूत बुडविण्यास गेले असतां सरजेरावानें अविश्वासानें दोन ब्रीगेड व कांहीं तोफा शिंदा व अमृतराव या दोघांचे फौजेंत तंटा झाला असतां बरोबर पाहिजेत अशा निमित्तानें घेऊन अमृतरावाचे लोकांवर एकाएकीं हल्ला केला, आणि त्याची फौज अगदीं उधळून टाकिली, परंतु या युद्धाचें कारण ज्या बाया त्या पूर्वीच तेथून पळून विठ्ठल वाडीस गेल्या होत्या. यामुळें शिंदा व पेशवा या दोघां मध्येंच युद्ध चालू झालें असें लोक म्हणूं लागले.

६ ही लढाई कदाचित दवलतरावानें करविली नसेल कारण पुढें त्या लढाईचा पुढारी सरजेराव यास त्याचे दुष्ट कर्मासाठीं शिंद्यानें कैद केला, आणि रयाजी पाटील व आबा चिटणीस यांस कारभारी केलें. याशिवाय फौज खर्चाचे संकटांत असतां नाना फडणविसास मुक्त करून त्याबदल त्यापासून दाहा लक्ष रुपये घेतले. आणि हीगोष्ट बाजीरावास जरी अनिष्ठ कारक होती तरी त्याणें नाना व शिंदा यांशीं स्नेह केला.

७ नाना मुक्त झाल्यावर बाजीराव त्याजला आपला कारभार पाहण्याचा आग्रह करूं लागला, परंतु शिंदा दाक्षिणेंत आहे पर्यंत आपला कारभार चालणार नाहीं म्हणून त्याणें हिंदुस्थानांत जावया साठीं त्याजला आपणा जवळचें आणखी पंधरा लक्ष रुपये देण्यास कबूल झाला, आणि त्याप्रमाणें दिले. परंतु बाजीरावास नानाचा भरंवसा न वाटून त्याणें शिंद्यास निघून जावयाची आज्ञा देणें ती न देतां आंतून त्यास राहण्याचा निरोप पाठविला, हीगोष्ट लवकरच नानास कळली, आणि त्याची रुजवात करूं लागला, तेव्हां बाजीराव तो निरोप पाठविण्याचें नाकबूल झाला, त्यासमयीं शिंद्यानें तो निरोप आणणारे शिवराम नारायण काळे व गोविंदराव थत्ते यांस कैद केलें, तेव्हां ती सर्व गोष्ट त्यांणीं मालकाचें नाव न सांगतां आपलेच आंगावर घेतली.

८ या नंतर शिंदा दक्षिणेंतच राहून, तो, बाजीराव व नाना हे तिघेही त्यासमयीं श्रीरंग पट्टणास टिपुसुलतान व इंग्रज यांशीं लढाई चालली होती त्यांचेप-

क्ष धरसोड करण्याचे विचारांत गुंतले होते इतक्यांत शिंद्याच्या पळालेल्या बायांचें प्रकर्णपुनः उद्भवलें. तें असें कीं, त्या बाया मागें विठ्ठलवाडीस पळूनगेल्या ह्मणून लिहिलें होतें, आणि यासमयीं त्या कोल्हापुरास जाऊन तेथें आश्रय करून राहिल्या आणि शिंद्याचे पदरचा नारायणरावबक्षी व दुसरे शेणवी लोक तसेंच कित्येक स्वार हे त्यांस जाऊन मिळाले, त्यायोगें कोल्हापूरकरबलाढ्य होऊन तो गोदावरीपर्यंत शिंद्याचेगांव लुटीत गेला आणि पुण्याजवळही शिंद्याचे फौजेस बहुत उपद्रव देऊन, तें बंडमध्य हिंदुस्थाना पर्यंत पोंहचविलें. तेथें लखबादादा ह्मणून शिंद्याचा एक पुराणा सरदार यास त्याणें बाळोबातात्याचास्नेह ठेविल्या कारणावरून कामावरून दूरकेलें होतें, त्याणें त्या बायांच्या हितास्तव कोल्हापुर करांचा पक्ष धरून उज्जनीपासून सिरोंज पर्यंत शिंद्याचा मुलूख आपले हस्तगत केला व येणेंकरून त्या राज्यांत सर्व लोकांनीं हत्यारें उचलून रयतेच्या नाशास आरंभकेला, व लखबादादानें पुढें आग्रा घेऊन त्या किल्यांत जाऊन बसला. त्याला तेथून काढण्यास डिबाईन नामें सरदारास योजावयाचें, परंतु तो त्या समयीं विलायतेस गेलाहोता, आणि त्याचें काम पेरननामक दुसरे सरदाराचे हवालीं झालें होतें तो आग्र्यावर चढाई करण्यास आणखी कुमक मागूंलागला व अशागर्दीच्या समयीं काशिरावहोळकराचा दासबंधू येशवंतराव जाणें नागपुरास आश्रय घेतला असतां शिंद्याच्या सांगण्यावरून त्याला भोसल्यानें प्रतिबधांत ठेविलें होतें, तो तेथून पळून धारेस येऊन तेथें थोडासा आश्रय मिळविता झाला, आणि अमीरखानपठाणाचे सहायानें माळव्यांत मोठीगर्दी करूंलागला.

९. अशी शिंद्याचे राज्यांत अव्यवस्था झाली तेव्हां त्याणें आपले नवीन केलेले दोनकारभारी रायाजीपाटील व आबाजी चिटणीस यांस पुढें कायतजवीज करावी ह्मणून विचारलें, तेव्हां त्यांणीं निष्कपटपणें सांगितलें कीं, बाळोबातात्यास कैदेंतून मुक्त करावें ह्मणजे सर्व यथायोग्य बंदोबस्त होईल. मग शिंद्यानें तसेंच केलें, आणि त्या बंडाव्यांतील सर्व लोक येऊन त्या बाळोबातात्यास मिळाले, व त्याणें आग्र्यास लखबादादानें ही लढूंनये असेंकेलें, व अकरालक्ष रुपये घेऊन त्याबाया बऱ्हाणपुरास राहण्यास कबूलझाल्या. परंतु त्या कोल्हापुराहून पुण्यास येतअसतां जेजुरीमुक्कामीं पोंचल्यावर तेथें त्यां बरोबरच्या एका गृहस्थास शिंद्याच्या

लोकांनीं मारिलें; असें ऐकतांच त्या तेथून निघून पंढरपुरास गेल्या, व त्यांचा तं-टातसाच राहिला असें असतां बाळोबातात्या व नानाफडणविस जेएक मेकां-च्या मसलतीनें त्या समयीं कारभार करित असत त्यांणीं प्रथम दक्षिणेंतील बैदा मोडण्याचें योजून ठरविलें कीं, पुढील पावसाळा सरण्याच्यापूर्वी तीसहजार फौ-ज तयारकरून प्रथम दाक्षिणेंतील बंदोबस्त करावा.

१० परंतु ही मसलत झाली नाहीं इतक्यांत सन १८०० च्यामार्च महि-न्याचे १ ले तारखेस नानाफडणवीस मृत्युपावला, आणि द्रव्य संग्रहा विषयीं त्याची लोकांत नऊकोटी नारायण अशीवार्ता होती यामुळें शिंदा व पेशवा या दोघांसही त्याचे द्रव्याचा लोभ सुटला व बाजीरावानें तें घेतलें असेल असें शिं-द्यास वाटून त्याणें नानाची जाहागीर जप्त केली, या शिवाय बाजीरावास भय दाखविण्या करितां नानाचे स्त्रीस दत्तक दिला.

११ यापुढें घाडग्यास शिंद्यानें मुक्तकेलें. असें करण्याचें कारण बहुधा त्या-चीकन्या शिंद्यास दिलीहोती तिणें आपलाबाप सोडविण्याविषयीं दवलतरावास प्रेमयुक्त मोहघातला असावा. तें कसेंही असो, घाडगा सुटतांच दवलतराव त्या-चे मसलतींत शिरला, आणि आपला प्रामाणिक कारभारी बाळोबातात्या यासपुनः कैदकरून नगरच्या किल्यांत त्याच्या दोघांबंधूंसह टाकिलें. तेथेंतो थोडक्याका-लानंतर स्वाभाविक मृत्यूनें मेला. परंतु त्याज बरोबरचे दोघेबंधू धोंडीबा व नाराय-णराव यांतून पहिल्यास तोफेचेतोंडी दिलें व दुसऱ्याचे हातापायांस बाणबांधून ते सोडिल्यावर त्याचे योगानें तो इकडे तिकडे हा पटून फुटून मेला. हें कृत्य त्या घाडग्यानें स्वतां करऊन "जणूकायखेळ" या प्रमाणें त्याचा तमाशा पाहिला कोकणांतील आंग्र्याचाकुलाबा एथील संस्थानांत शिंद्यानें हातघालून तेथें बळेंच. आपणांकडील कोणी आंग्र्यास्थापिला, तसेंच बाजीरावास गादीवर बसविण्याक-रितां त्याणें पटवर्धनाची सर्व जाहागीर शिंद्यास देऊंकेली होती तीघ्यावी, असें ह्या घाडग्यास वाटून हा कोल्हापुरकराकडे गेला, आणि त्या कडून पटवर्धनाचे जाहागिरीचे मुलखांत लूट करविली, व निपाणकराकडे पांचपलटणें देऊन त्या-जलाही तो मुलुख घ्यावयास सांगितलें. त्या योगें पटवर्धनाच्याजरी कांहींसा नाश-झाला तरी शिंद्यास किमपी लाभझाला नाहीं.

१२ शिंदा बहुतकाळ पर्यंत पुण्याचेच कारभारांत राहिल्यामुळें त्याच्या माळवा व हिंदुस्थानांतील राज्यांत बहुत अव्यवस्था झाली व येशवंतराव होळकर व अमीरखान पठाण होळकराचे घराण्यांतील सर्व पुराणेसरदार एकत्र जोडून व शिंद्याचे इलाक्यांत बहुत उपद्रव देऊन होळकराचें घराणें शिंद्याचेहातून सोडविण्याकरितां तें लश्कर दक्षिणेकडे निघालें, आणि गोदातिरीं शिंद्याचे कांहींगांव लुटले, इतक्यांत त्याचे पराभवाकरितां काशीराव होळकरानें दोन पलटणें पाठविलीं, परंतु येशवंत रावानें त्यांस जिंकलें तेव्हां ते पलटणीलोकही त्यासच जाऊन मिळाले, आणि तो होळकर मोठ्या राजा प्रमाणें वागूंलागला. त्याचामोड करण्यास दवलतराव तावडतोब जावयाचा परंतु त्याच्या कारभारी मंडळींत फुटाफूट झाली, आणि ते काशीरावहोळकराचे नाशास प्रवृत झाले. त्यासमयीं त्यांणीं असा घाट घातला कीं, यशवंतरावास काशीरावाचा उपद्रव न लागावा ह्मणून शिंदा अनुकूल करून घेण्यास त्या जवळ यशवंतरावानें कबूल केलें कीं, आपण शिंद्याच्या भटकणाऱ्या बायांस धरून देतों, आणि त्याप्रमाणें त्या बाया ज्या यावेळीं पंढर पुराहून येऊन बऱ्हाणपुरीं राहिल्या होत्या, त्यांस पकडण्यांकरितां त्यांचे छावणीसभोंवती वेढादिला. परंतु त्या यशवंतरावास नकळतां पळून गेल्या तेव्हां शिंदासमजला कीं, होळकरानेंच त्यांनाजाऊं दिलें यास्तव शिंदा स्वयेंच होळकराचे पारिपत्यास निघाला.

१३ यापूर्वी बाजीरावाजवळून ऐवजयेणें होता त्याचा तगादा शिंद्यानें त्यास लाविला होता, आणि त्या ऐवजाबद्दल त्याणें या समयीं शिंद्यास त्रेचाळीस लक्षांच्यां हुंड्या दिल्यावर पुण्यामध्यें आपले दाहाहजारस्वार व पांचहजार पायदळ सरजेराव घाडग्याचे हाताखालीं ठेऊन आपणमोठी फौजघेऊन उत्तरेकडे निघाला. तो बऱ्हाणपुरास आल्यावर करनल हे शिंगनांमें फ्रेंच सरदारा बरोबर आपली कवाईत शिकलेलीं च्यारपलटणें देऊन होळकर जो त्यासमयीं शिंद्याची राजधानी ऊज्जनी शहर लुटणार होता त्याचे प्रातिबंधास पुढें रवाना करून त्याच्यामागें आणखीही दोन पलटणें पाठविलीं, त्या दोन्हीफौजा कांहीं अंतरानें जातांजातां पुढली टोळी उज्जनीजवळ पोंचली, तेव्हां होळकर जो समीपच होता त्याणें पुढचे टोळीशीं आपले थोडेलोक लढण्यास ठेऊन आपण मोठ्या फौजेनि-

शीं शिंद्याचे पुढचे टोळींतील लोकांस न कळतां मागल्या धाकट्या टोळीवर ए-
का एकीं पडला. आणि त्यांचा अगदीं मोड करून पुढच्या फौजेस तेलोक कुम-
क न करतील असें केलें, आणि ती आपली विजयी झालेली फौज शिंद्यांचे पुढचे
टोळीवर नेऊन त्यांशींही बहुत निकरानें तो होळकर लढला. या लढाईत शिंद्या-
चे चारही पलटणांचा अगदीं नाशझाला, व त्या बरोबरच्या अकरा फ्रेंच सरदारां-
पैकीं सात मारले गेले, तीनकैद झाले, व एकटा हेशींगमात्र राहिला. ही लढाई
सन १८०० च्या जून महिन्यांत झाली. या नंतर यशवंतराव होळकरानें उज्ज-
नीशहर स्वस्थ चित्तें घेतलें, आणि तेथें यथेच्छ लूटही केली असती, परंतु तें मा-
हांकाळीचें पवित्रस्थान यामुळें त्याचेमनांत तसें करण्याची शंका आली असावी.
यास्तव त्याणें तेथील श्रीमंतलोकां पासून द्रव्य बहुत घेऊन शिंद्याचें मोठें लष्कर
जें त्या समयीं नर्मदा उतरत होतें त्यास तो अडविण्यास आला. परंतु एथें शिंद्याचे
फौजेनें त्यासमागें हटविलें. यामुळें शिंद्यासही कांहींसा धीर आला, आणि सर्जेरा-
वास आपले पुण्यांतील फौजेसह कुमकेस बोलाऊन त्याचे हवालीं सुमारें पंचवी-
स हजार फौजकरून यशवंतराव होळकराचा सूड उगविण्या करितां व त्याची
राजधानी इंदुरशहर तें घेण्याकरितां पाठविलें. हा बातमी ऐकतांच होळकरानें
सर्वफौज आपली राजधानी रक्षण्याकरितां जमाकेली, तों सर्जेरावानें येऊन त्या
शहरास वेढा घातला, आणि सामग्री आंतजाणें बंदकरून आपल्या मोठ्यातोफा-
नींत्या शहरावर अग्नीचीवृष्टि चालविली. तो मार होळकराचे फौजेस सहनहोई-
ना तेव्हां त्यास तीजागा सोडूनजाणें भागपडलें, आणि तो महेश्वराकडे गेला. मा-
गें सर्जेरावाचे हातीं होळकराच्या ९८ तोफा लागल्या, आणि इंदुरशहर यांचे
स्वाधीन झाल्यावर तेथील बहुतेक राहाणारे गृहस्थ व त्यांची मालमत्ता यांचासं-
हार केला, आणि तितक्यानें ही शांत न होतां त्यांजपासून सर्वस्व हरण करण्याक
रितां पेंढारी लोकांचे गांधील त्यांजवर मोकळें सोडिलें.

१४ शिंदा माळव्यांत आल्यावर त्याचा बाप महादजी शिंदा यास आपलें
राज्य वाढविण्या विषयीं जा शंका होत्या त्यांतून दवलतरावास अगदीं नाहींशां
दिसल्या, कारण मागें आनंदराव पंवार याणें यशवंत राव होळकरास कांहींशी
गुप्तपणें मदत दिली होती, त्या गोष्टीच्यासबंधानें त्या धारच्या पवार रीजाचा

दिवाण माळकावर फिरला होता, त्याचा दवलतरावानें पक्ष धरून त्याबद्दल त्या संस्थाना पैकीं, आगर, व सुनेल, हे दोन परगणे घेतले, व देवासचे राजाचा सर्व मुलूख जिंकून त्या संस्थानिका पासून खंडणी घेऊन मग तो त्यास परंत दिला. याशिवाय होळकराचा परांभव केल्यावर इंदुर व दुसरे परगणे त्या घराण्यांतील वारसाचा बंदोबस्त होई पर्यंत पेशव्यांचे अथवा दुसऱ्या कोणाचेंही नांवानें घेण्याचें जाहीर न करितां शिंद्यानें आपल्या कामदारांकडे त्याची वहिवाट सांगितली. हीगोष्ट मागील कारकीर्दीस त्यासमयीं इतकी विरुद्ध दिसली कीं, होळकराचे घराण्याचा लय होतो असें समजून त्या घराण्यांतील यशवंतरावाचे प्रतिपक्षी लोकही त्यास सहाय होऊन तें घराणें शिंद्याचे हातून मुक्त करण्यास एकत्र जमले. आणि यशवंतराव त्या सर्वांस बरोबर घेऊन बाजीरावानें आपला व शिंद्याचा तंटा तोडण्यास मध्यस्थ व्हावें. नाहींतर पुण्याचे आसमंतांत बैदा करावा अशा बेतानें फौजेसह दक्षिणेकडे चालिला.

१५ दवलतराव शिंदा त्यासमयीं उज्जनीस होता. त्याणें होळकर दक्षिणेंत जाण्याचें ऐकतांच पुण्यास आपली तूर्त अगदीं फौज नाहीं यामुळें तेथें आपलें वजन राहणार नाहीं, या भयास्तव सदाशिव भास्कर नामें कोणी सरदारा बरोबर दहाहजार फौज देऊन पुण्याकडे रवाना केलें. तो होळकराचे फौजेची वाट सोडून दुसऱ्याचवाटेनें पुण्यास पेशव्याचे फौजेस येऊन मिळाला, आणि होळकरास अडविण्या करितां उलट चालिला. इतक्यांत ते लोक आपणावर जमून येतात असें पाहून आपण त्वरेनें अहमदनगरावरून जेजुरीस गेला, आणि तेथून राजवाडीचे घाटानें सन १८०२ च्या अकटोबरच्या २३ वे तारखेस लोणी व हडपसर यांमध्यें येऊन उतरला व शिंद्याचेंही लश्कर येऊन गारपिरावर उतरलें. यापुढें होळकर बाजीरावास म्हणूंलागला कीं, आपण शिंद्याचा पक्ष सोडून आपला पुतण्या खंडेराव, मल्हाररावाचा मुलगा कैद केलेला आहे, त्यास सोडून द्यावा, व आपली आज्ञा शिंदा मानीत नाहीं, त्यास मी त्याशीं लढून पेशव्याचा मान रक्षीन. परंतु या बोलण्यास बाजीराव कबूल न होऊन शेवटीं २५ वे तारखेस त्या दोन्ही फौजा लढण्यास सिद्ध झाल्या. त्यासमयीं होळकराची सेना, चवदा कवाईत शिकलेलीं पलटणें. खेरीज पांचहजार पायदळ व पंचवीस-

हजारस्वार अशी होती. शिंदे व पेशवे यांचे फौजेंत पलटणें होतीं परंतु त्यांचा बंदोबस्त नीट नसून स्वार कमती होते. या दोन्ही फौजांनीं प्रहर दिवसानंतर एकमेकांचे अंगावर तोफांचा मार केला, त्या नंतर स्वार व पायदळांचे हल्ले झाले, त्यांत प्रथम होळकराचा मोड झालासा दिसला. त्यासमयीं त्या होळकरानें धाऊन जाऊन आपल्या पळालेल्या स्वारांस जमाकरून त्या शिंद्याच्या स्वारांवर पुनः हल्ला आणिला, आणि त्यांचा पराभव करून डिबाईनच्या हातचीं भरलेलीं पलटणें जीं मोठ्या निकरानें लढत होतीं त्यांच्या रांगा फोडून अगदीं नाशकेला, व सर्व गोलंदाज मारून तोफा घेतल्या व त्यानंतर सर्व बुणगें लुटलें. त्यासमयीं शिंद्याचे पलटणाची अवस्था, मागें लखेरी मुकामीं होळकराचे पलटणाचे अवस्थे सारखी, झाली, आणि याचा परिणाम असा झाला कीं, बाजीराव पेशवा इंग्रजाचे आश्रयास वसईस गेला. हें वर्तमान सन १८०२ च्या अखेरीस घडलें.

१६ यामागें सन १८०० च्या अकटोबरांत निजामानें आपल्यास टिपूचे लढाईंत आलेला सर्व मुलूख इंग्रजाचे हवालीं करून त्याबद्दल इंग्रजी फौज आपले चाकरीस ठेविली, आणि कांहीं परचक्र आलें असतां तेंही संभाळावें असें ठरविलें, यामुळें निजामाचे मुलुखांत हमेष स्वाऱ्या घालणारे जे मराठे सरदार त्यांचा उपद्रव प्रथम संभाळला पाहिजे म्हणून त्या झालेल्या तहाप्रमाणें मान्यता घेण्यास मराठी सरदारांकडे इंग्रजांनीं एजंट पाठविले. त्यांतून पेशव्यांकडे कर्नल क्लोझ नामें साहेब गेला, आणि कर्नल कालीन नामें जो साहेब कांहीं वेळपर्यंत फतेगडास ( फरकाबाद ) होता त्यास दवलतराव शिंद्याकडे पाठविलें. त्यासमयीं होळकराचे बंडामुळें शिंदा बहुत अडचणींत आहे सबब आपण ह्मणूतें तो कबूल करील असें इंग्रजास वाटलें होतें, परंतु शिंद्याजवळ त्यासमयीं बलाढ्य सेना होती ह्मणून तो त्यांणीं म्हटलेल्या तहास कबूल झाला नाहीं, तेव्हां तो साहेब सन १८०१ च्या मे महिन्यांत दवलतरावाचें दरबार सोडून परत गेला.

## भाग ७.

आजपर्यंत शिंद्याचे घराण्याची वाढती भरभराट खुंटविण्यास, रजपूत, मुसलमान, किंवा दुसरे मराठे सरदार यांशिवाय, इंग्रज याणीं प्रयत्न केले, परंतु त्यांमध्यें शिंदा अंतीं जय पावत असे. यामुळें इंग्रजास, याचें राज्य मोठें, व सैन्य बलाढ्य याचा स्वाभाविक मत्सर उत्पन्न झाला. आणि तो वृद्धिंगत होण्यास आणखी कांहीं कारणें झालीं तीं अशीं कीं, युरोपा मध्यें इंग्रजाचे शत्रु जे फ्रेंच लोक त्यांपैकीं शिंद्यानें आपले चाकरीस कांहीं ठेविले होते, आणि फौजेचें आधिपत्य त्यांचे हातीं देऊन त्या फौजेच्या खर्चास लाऊन दिलेल्या मुलुखाची वहिवाटही त्यांकडेसच सांगितली, शिंद्याची बहुतेक फौज दक्षिणेंत राहूं लागली, यामुळें त्यासमयीं खोरासानचा राजा झामानशाहा हा पश्चिमे कडून हिंदुस्थानावर स्वारी करणार असें बरेंच धोरण दिसत होतें, त्याचे पराभवाचें वजन एकट्या इंग्रजावरच पडणार असें दिसलें, व शिंदे आणि होळकर यांच्या फौजा नेहेमीं दक्षिणेंत रयतेस पीडा देऊं लागल्या, व शिंद्याचा दिवाण सरजेराव घाडगा याची निर्दयता व क्रूरपणा यांस पार नाहींसा झाला, तेव्हां इंग्रजास वाटलें कीं, या फौजांस मराट्यांचे मुलुखांत लुटण्यास कांहीं नाहींसें झालें म्हणजे इंग्रज व त्यांचा स्नेही जो निजाम यांचा मुलूख ओसाड पाडण्यास शिंद्याचे फ्रेंचसरदार चुकणार नाहींत. याकारणां पैकीं फ्रेंच लोक शिंद्याचे दरबारांत असणें हें इंग्रजास बहुतच विषम वाटे, आणि त्याचे उलट दवलतराव शिंदा त्या लोकांची युरोपांतील स्थिति मनांत न आणितां म्हणेकीं, कोणत्याही माणसास चाकरीस ठेवण्या विषयीं इंग्रज लोकांचा आग्रह मान्य करणे हें अयोग्य आहे. केवळ ते लोक इंग्रजाचे शत्रु म्हणून यांचे आग्रहामुळें त्यांस चाकरीस न ठेवावें तर तसें करण्यास इंग्रजाचे आपल्यावर विशेष उपकारही नाहींत. उलट राज्य संपादण्या विषयीं फ्रेंच लोकांचेच शिंद्यावर भारी उपकार होते. यामुळें इंग्रजाचे आपस्वार्थी सागण्या कडे आपण मन न देतां फ्रेंचास तसेंच आपले चाकरीस राखलें.

२ ही शिंद्याची वर्तणूक हिंदुस्थानांत इंग्रजाचे राज्याची वृद्धि इच्छिणाऱ्या लोकांस बहुत दुःसह झाली, आणि तशांत सन १८०० च्या अकटोबर महिन्यांत निजामानें आपले वांटणीस आलेला टिपूचा सर्व मुलूख इंग्रजाचे स्वाधीन करून त्याबद्दल त्यांची आपले जवळ फौज चाकरीस राहावी, व परचक्राचें निवारण इंग्रजांनीं करावें, असा तह केला, सबब त्या निजामाचे मुलुखांत नेहेमीं स्वाऱ्या घालणारे मराठे सरदार यांची त्याजवर मान्यता घालून घेऊन त्यांज बरोबरही तसाच तह ठरवावा, आणि निजामास त्यांचा उपद्रव न लागतां उलट महाराष्ट्र देशांतच आपला संचार व्हावा, याकरितां मराठी सरदारांकडे रेसिडेंट पाठविले होते, परंतु ती गोष्ट त्यासमयीं सिद्धीस नगेली हें ही त्यांस बहुतच वाईट वाटलें. आणि त्या लोकांत आपसांत तंटे पडून आपली त्यांस कधीं गरज लागेल त्या समयाची ते वाट पाहत बसले होते. इतक्यांत सन१८०२च्या अकटोबर महिन्याचे पंचविसावे तारखेस शिंदा व पेशवा यांचे जमलेल्या फौजेचा यशवंतराव होळकरानें पराभव केला, तेव्हां बाजीराव वसईस इंग्रजांचे आश्रयास गेला, आणि त्यांणें आपणास पुनः गादीवर स्थापपण्या बद्दल त्यांच्या म्हणण्या प्रमाणें, म्हणजे युरोपा मध्यें इंग्रजांचें शत्रुत्व करणाऱ्या देशांतील कोणी गृहस्थ चाकरीस न ठेवणें, इंग्रजाचीं सहा पलटणें आपल्या राज्यांत नेहेमीं चाकरीस ठेवणें व त्यांचे खर्चा बद्दल २६ सवीस लक्षांचा मुलूख तोडून देणें वगैरे निजामा प्रमाणेंच कलमें ठरून तारीख ३१ दिसेंबर १८०२ रोजीं तह केला, तेणें करून मराठ्यांचें राज्य पोटांत घेण्यास इंग्रजांस चांगली संधी सांपडली.

३ आजपर्यंत जे इंग्रजाचे व मराठ्यांचे तह होत ते सर्व मराठी मंडळ एकत्र जमून होत असत, व मागें १७८२ च्या सालीं सालपें मुक्कामीं जो तह झाला, तो महादजी शिंदा पुढारी होऊन झाला, आणि या समयीं बाजीरावानें आपस्वार्था साठीं एकट्यानेंच तह केला, सबब हा तह शिंदा व आणखी मराठे सरदार, ज्यांचें कांहीं नुकसान झालें असेल त्यांणीं या तह नाम्यास कांहीं अटकाव केला असतांही बाजीरावास पुनः गादीवर बसवून आपला पाय पेशव्यांचे मुलुखांत दृढ करण्या करितां गव्हरनर जनरल यांणीं सुमारें पंनास हजार फौज तयार केली. त्यापैकीं साहा हजार, जनरल लेक यास राजकीय संबंधीं मोठा अधिकार

देऊन त्याचे हाताखालीं कानपुरास ठेविली, आणि कांहीं गुजराथेंत व कांहीं मुंबईस ठेऊन बाकीची म्हैसूर व हैदराबाद एथील फौज बाजीरावास गादीवर बसविण्या करितां पुण्याकडे चालविली. या फौजांचे चढाईचें वर्तमान ऐकून होळकर पळाला, आणि ही बातमी वसईस कळतांच बाजीराव मुंबईचे फौजे बरोबर निघाला. त्याला १८०३ मध्यें मे महिन्याचे १२ वे तारखेस मोठ्या समारंभानें पुण्यास पुनः इंग्रजांनीं आणून गादीवर बसविलें. वसई मुकामचा तह नामा ठरल्यावर कर्नल कालीन यास त्यावर शिंद्याची मान्यता घेण्यास पाठविलेंच होतें.

४ इकडे शिंद्यानें आपले फौजेचा नाश व बाजीरावाचें इंग्रजाचे आश्रयास जाणें हीं ऐकून फ्रेंच सरदारांच्या कांहीं ब्रीगेडी बरोबर घेऊन तो मोठ्या तयारीनें होळकराचा सूड घेण्यास निघाला तो तारीख ४थी फेब्रुआरी १८०३ रोजीं नर्मदा उतरला, आणि पुढें २३ वे तारखेस बऱ्हाणपुरास आला. नंतर २७ व्या तारखेस कर्नल कालीन वसईच्या तहनाम्याची नकल घेऊन त्याजवर मान्यता मागण्यास शिंद्याचे दरबारांत आला. तेव्हां आपला शत्रु होळकर जाअर्थीं पुण्यास राहिला नसून दक्षिणेंत येण्याचा हेतु बाजीरावास गादीवर बसविणें तोही सिद्ध होतो त्या अर्थीं झालेल्या तहास आपली गैर मान्यता नाहीं असें त्यानें दाखविलें.

५ इकडे बाजीरावानें वसईस तहनामा ठरविल्यावर त्यास वाटलें कीं, आपण केलें हें गैरकेलें, तेव्हां त्याणें आगखी मनांत आणिलें कीं, इंग्रजाचे हातून आपलें काममात्र करून घेऊन शिंदा व भोंसला यांस पुण्यास फौजेनिशीं बोलाऊन त्यां कडून इंग्रजांस घालवावें, आणि हाबेत सिद्धीस जाण्या करितां त्याणें शिंदा व भोसला यांस कळाविलें कीं, तुह्मीं त्या तहावर मान्यता न घालतां व मीं अडचणीचे प्रसंगीं इंग्रजाशीं तहकेला, त्याचा राग न धरितां माझे कार्यासाठीं पुण्यास यावें. मग आंतीलसर्व मजकूर त्यांस कळण्या करितां दोघांकडे दोन आपले विश्वासू माणूस वसईच्या तहाचा मजकूर कळविण्याच्या बाहाण्यानें पाठविले, त्यांत शिंद्याकडे बाळोजीकुंजर आला.

६ या मसलतीचें कांहीं वर्तमान बाहेर फुटलें तेव्हां या फौजा पुण्याकडे चालल्या असतां बाजीरावाचें रक्षण तहनाम्याप्रमाणें झालें पाहिजे, ह्मणून म्हैसूरची फौज पुण्यास बोलाऊन हैद्राबादच्या फौजेसही पुढें वाढविण्याचा हुकूम झाला,

आणि तहनाम्यावर मान्यता घालण्या विषयीं रेसिडेंटानें शिंद्यास निकड लाविली; तेव्हां शिंद्यानें प्रथम पेशव्यांकडून वकीलयेत आहे तो आल्यावर जबाब देऊं असें सांगितलें. परंतु असें दिसतें कीं, बाळोजीकुंजर याजकडे येऊन गेल्यावर शिंद्याचे दिवाणानें रेसिडेंटास पुण्यास इंग्रजीफौज आणण्या विषयीं निषेधिलें. या शिवाय दवलतरावानें होळकराशींही कांहीं बोलणें लाविलें. व भोसला नागपुराहून शिंद्याचे फौजेंत मिळण्यास चालला. येणेंकरून शिंदा लढाई केल्यावांचून राहाणार नाहीं, असें इंग्रजास वाटून गवरनरजनरल याणें जनरल वेल्सली यास राज-कीय खात्याचा मोठा अधिकार देऊन प्रसंग पडल्यास निकरानें लढण्याविषयींही हुकूम दिला.

७ या नंतर रेसिडेंटानें तारीख २७ मे रोजीं शिंद्याची भेट घेऊन तहनाम्याची नकल दिली, त्याजवर याणीं कांहीं आक्षेप घेतला नाहीं. या शिवाय शिंदा व भोसला यांणीं आपल्या फौजा परस्परांचे हद्दींत न्याव्या ह्मणून त्याणें आग्रह धरिला. तेव्हां शिंद्यानें सांगितलें कीं, आमच्या फौजा आमचे हद्दींतच आहेत आणि इंग्रजांनीं अम्मली सर्वफौजे पूर्वस्थलास पाठविली ह्मणजे आमची ही जाईल. यापुढें तह किंवा लढाई करणें हें स्पष्टपणें विचारल्यामुळें नागपूरकर भोसल्याचीभेट-झाल्यावर सांगूं ह्मणून सांगितलें.

८ या नंतर ती भेटझाली तेव्हां त्याणीं बाजीरावाचा पक्ष उचलण्याचा बेत ठरविला, आणि त्या गोष्टीस होळकरासही सहाय होण्यास सांगितलें. तेव्हां त्याणें याजला स्पष्टउत्तर कांहींच नदेतां आपला मुलूख शिंद्यानें दाबला आहे तो सोडावा व खंडेराव होळकर बाजीरावाचे कैदेंत आहे त्यास मुक्तकरावें असें बोलणें लाविलें. तें त्याणीं मान्यकरून त्याचा इलाखा व पुतण्या मुक्तकेला, परंतु तो होळकर नर्मदा उतरून आलेला असतांही पुन्हा उत्तरेकडे गेला.

९ या नंतर रेसिडेंटानें आणखी एकवेळ शिंद्याचीभेट घेऊन तहनामा मान्य करण्या विषयीं विचारलें, आणि लढाईकरण्यास कबूल असल्यास तसें कळवावें ह्मणून आग्रह करूं लागला. तेव्हां हा तह मागील वहिवाटी प्रमाणें आमचे विद्यमानें व्हावातसा झाला नाहीं सबब मान्यकरितां येत नाहीं. या प्रमाणें उत्तर मिळाल्यावर कर्नल कालीनं शिंद्याचें दरबार सोडून ता० ३ आगष्ट रोजीं गेला आणि वेल्सली साहेबास जाऊन मिळाला.

१० रेसिडेंट परत येतांच जनरल वेल्सली याणें अहमदनगरचे किल्यावर तारीख ८ वीस हल्लाकेला. त्या समयीं तेथें शिंद्याची एक पलटण व कांहीं आरब लोकांची शिबंदी होती. त्याणीं, इंग्रजानीं किल्याचे तटास तोफांचेगोळ्यांनीं आंत हल्ला करण्या पुरतें खेंडार पाडतांच तो किल्ला शत्रूचे हवालीं करून दिला आणि तेणेंकरून त्या खालचा ६२४००० चा मुलूख इंग्रजाकडे आला. तेव्हां तेथें बंदोबस्तास कांहींफौज ठेऊन जनरल वेल्सली शिंद्याच्या फौजेकडे उत्तरेस चालला, व शिंदाही अजिंठ्याचा घांट उतरून निजामाचे राज्यांत संचार करण्यास निघाला.

११ असें दक्षिणेंत वर्तमान चालले असतां कानपूर मुक्कामीं जनरल लेकहा रेसिडेंट शिंद्याचे दरबारांतून परत आल्याची बातमी ऐकतांच आगष्ट महिन्याचे ७ वे तारखेस निघाला, तोपुढें २७ व्या तारखेस अल्लीगडास आला. या ठिकाणीं शिंद्याचामुख्य फ्रेंच सरदार पेरन तो सुमारें १५००० फौज घेऊन तेथील किल्याचें रक्षण करीत होता त्याशीं व इंग्रजाशीं तारीख ४ सप्तंबर रोजीं मोठी लढाई झाली तींत शिंद्याकडील दोनहजार लोक पडले,तसेच इंग्रजांकडील २७१ पडले.

१२ या नंतर पेरनसाहेब लढाई न करितां फौजेचें त्याजपाशीं बहुत सामान होतें तें विकून व कांहीं इंग्रजास देऊन अत्यंत मोलवान बरोबर घेऊन कुटुंबासुद्धां कोएल व अल्लीगड वगैरे त्याचे हाताखालचीं ठाणीं लढाई न करितां इंग्रजास देऊन आपण लखनौस चालता झाला. त्याचें कारण असें झालें कीं, शिंद्यानें पेरन साहेबास एवढामोठा अधिकार दिला, हें दरबारांतील दुसरे लोकांस आवडलें नाहीं, आणि मागें कालीनसाहेब फरका बादेहून शिंद्याकडे रेसिडेंटाचे कामावर गेला. त्याणें जातांना पेरन साहेबाचा अधिकार, वैभव व फौजेची तयारी हीं पाहून गेला होता त्याणें त्याविषयीं दरबारचे लोकांजवळ कांहीं अधिक हेवा-उत्पन्न होण्याजोगा मजकूर सांगितला. त्यावरून त्या दरबारी लोकांनीं शिंद्याकडून पेरनसाहेबाचा अधिकार कमीहोण्या करितां त्याची कांहीं जाहागीर जप्तकरण्याचा बेत केला, तेव्हां रेसिडेंटानें हेंचवर्तमान कलकत्यास लिहिलें. त्यावरून जनरल लेक यास कलकत्याचें लिहिणे आलें कीं, "पेरनसाहेब शिंद्याशीं नाराजी

झालेला आहे, अशासमयीं त्यास फितूर करून तो आपल्या लढाईचें सामान देत असल्यास तें सर्व किंमत देऊन विकत घ्यावें व तो आपल्या इलाख्यांतून जात असल्यास त्यास जाऊं द्यावें. या प्रमाणें जनरललेक याणें पेरनसाहेबाशीं बोलणें लाविलें, परंतु प्रथम त्यास तें खरें वाटलें नाहीं. ह्मणून त्याणें अल्लीगडास लढाई आरंभिली, परंतु इंग्रज आपल्यास सुरक्षित जाऊं देतील व शिंदा आपला अधिकार खचीत कमी करणार अशी खातरी झाली. तेव्हां त्याणें इंग्रजाचे बोलण्याचें कबुलायतीचें पत्र सपेंबरच्या ५ व्या तारखेस जनरललेक याजकडे पाठविलें, आणि आपण सर्व टाणीसोडून लखनौस कुटुंबसुद्धां गेला.

१३ पेरन याणें दिलेले किल्ले घेऊन जनरल लेक पुढें दिल्लीकडे चालिला, तो अकराव्या तारखेस दिल्लीपासून तीनकोस आलीकडे जाऊन उतरणार इतक्यांत शिंद्याचा बुर्की नामें दुसरा फ्रेंच सरदार सुमारें सातहजार फौज घेऊन लढण्यास आला. त्याशिंही मोठी लढाई झाली. त्यांत शिंद्याचा पराजय होऊन ६८ तोफा इंग्रजांस मिळाल्या. शिंद्याचे तीनहजार लोक मेले व जखमी झाले. इंग्रजांकडील ही ४८५ मेले. त्या लढाई नंतर जनरल लेक दिल्लीस जाऊन तेथील अंध बादशाहास आपले आश्रयास घेउन त्याचे बंदोबस्तास कर्नल अकटरलोनी यास ठेविलें, आणि आपण आग्र्यास आला. या ठिकाणीं शिंद्याचीं सातपलटणें किल्याचे बाहेर पडलेलीं होतीं. त्याणीं प्रथम इंग्रजांशीं लढाईचा डौलमात्र दाखऊन तारीख १२ अकटोबरास फितूर होऊन इंग्रजाची चाकरी धरिली. या नंतर किल्यावर तोफखाना सुरु केला, तेव्हां आंतील शिबंदीनें १७ व्या तारखेस किल्ला हवालीं केला.

१४ या नंतर शिंद्याचीं १७ पलटणें दुआब प्रांतांत फिरत होतीं. ही फौज शिंद्यानें दक्षिणेंतून लढाईचे आरंभीं हिंदुस्थानांत रवाना केली होती, ती मागून पोंचली. त्यांजला जनरल लेक साहेबानें अकटोबराचे ३१ वे तारखेस फरकाबादचे इलाख्यांत लासवारी मुकामीं गांठलें. तेव्हां मोठें युद्ध झालें. त्यांत शिंद्याचा बहुतच नाश झाला. ७२ तोफा इंग्रजांकडे गेल्या व दोनहजार लोक हत्यारें ठेऊन शत्रूचे स्वाधीन झाले. त्यासमयीं इंग्रजाचाहीं फार नाश झाला. एकजनरल, व दोन कर्नल याशिवाय आणखी लहान सरदारें व शिपाई मिळून १७२

मेले व ६५२ जखमी झाले. जनरल लेक साहेबाचे दोन घोडे मेल्यावर त्याणें आपल्या मुलाचा घोडा घेऊन त्यावर चढत आहे इतक्यांत त्याच्या मुलास गोळी लागून, तो पडला, त्याला तेथें तसाच टाकून तो पुढें गेला.

१५ याप्रमाणें दुआव प्रांत इंग्रजांनीं जिंकून घेतला. गोहदच्या राण्याचा प्रांत अंबुजी इंगळे यांचे वहिवाटीस होता. हा सरदार लढाई न करितां आरंभींच इंग्रजास जाऊन मिळाला होता, म्हणून तो त्याकडेसच राहिला.

इकडे गुजराथेमध्यें मुंबईची फौज आली होती. तिणें शिंद्याचे भडोच व पवनगड हे किल्ले घेतले.

१६ दक्षिणेंत जनरल वेल्सली अहमदनगरचा किल्ला घेऊन निघाला, तो २४व्या आगष्टीस गोदावरी एथें उतरला, आणि त्याच दिवशीं शिंदा व भोसला यांची फौज अजिंट्याचा घाट चढली, आणि निजामाचे मुलखांत प्रवेश करूं लागली. जेव्हां वेल्सली २९ व्या तारखेस अवरंगाबादेस गेला, त्यावेळीं त्यास वाटलें कीं, आग्नेयी दिशेस ती जाऊन निजामाचे हैदराबादेकडे जाणार. असें पाहून, कर्नल स्टिफिनसन यास त्याणें पूर्वेकडून शत्रूवर बोलाविलें. त्याप्रमाणें त्याणें जाऊन जलनापूर घेतलें, आणि शिंद्याचे आंगावर चालकेली. तेव्हां मराठी फौज पुनः उत्तरेकडे जाऊं लागली, आणि अजिंट्याजवळ आली. तेथें तीस बेगम सुमरू व आणखी फ्रेंच सरदार यांची मदत येऊन मिळाली. तेव्हां तिणें दक्षिणेकडे न जावें म्हणून जनरल वेल्सली गोदावरीचे उत्तर किनाऱ्यानें पूर्वेस चालला. तो त्याची व कर्नल स्टिफिनसन याची सप्तंबरच्या २१ व्या तारखेस गांठपडली; तेव्हां त्यांणीं २४ व्या तारखेस हल्ला करण्याचा निश्चयकेला. त्यासमयीं शिंदा व भोसला यांच्या फौजा खेळणा व जुआ या दोहो नद्यांचे संगमाजवळ असई खेड्यास होत्या. त्यांणीं हल्ल्याचें वर्त्तमान ऐकून आप आपल्या फौजेचा कांहीं भाग तळावर ठेऊन ते बाकीच्या फौजेनिशीं चालते झाले. ही बातमी ऐकून जनरल वेल्सली जो त्यासमयीं साहाकोशांवर आला होता, त्याणें कर्नल स्टिफिन याची वाट न पहातां तेविसाव्या तारखेसच, शिंद्याचे राहिलेल्या फौजेवर हल्ला केला. इंग्रजी फौज प्रथम शिंद्याचे समोर चढून आली, परंतु याठिकाणीं शिंद्याकडील स्वार मजबूतीनें राहिले आहेत असें तीस कळल्यावर त्या स्वारांस भय दाखविण्या-

स म्हैसूर व पेशवे यांजकडील कांहीं स्वार ठेवून जनरल वेल्सली खेळणानदी शत्रूचे डाव्यावाजूनें उतरला. आणि त्यानें आपली सर्व फौज तेथें आणिली. तेव्हां मराठ्यांनीं आपली जागा बदलली, आणि इंग्रजी फौजेच्या समोर होऊन तोफखाना सुरूकेला, आणि स्वारांनींही त्याजवर हल्ला करून, इंग्रजी तोफखान्यास पुढें होण्यास ताकद नाहींशी केली. तेव्हां त्यांनीं स्वारांचा हल्ला आणिला, त्यायोगें मराठी लश्करास मागें जाणें भागपडलें. परंतु हें जातअसतां कांहीं लोकें जुआ नदींत बुडाले, व बाकीची फौज युद्धसोडून ९८ तोफा व दाहाबावटे मागें टाकून चालती झाली. तीस इंग्रजी फौज अटकाव करूं सकली नाहीं. मराठी फौजेनें यायुद्धांत असा एक चमत्कार केलाकीं, तोफखान्यावर जेव्हां स्वारांचा हल्ला आला, तेव्हां गोलंदाज मृतवत पडले; आणि स्वार आपल्या आंगावरून गेल्यावर त्याणीं त्यांस पाठीमागून तोफांच्या मारानें मारिलें. या लढाईंत शिंद्याचे १२०० लोक पडले व इंग्रजाचे १५६६ मेले व जखमी झाले. या लढाईंत जनरल वेल्सली साहेबानें मोठा पराक्रम केला खरा, परंतु शत्रूचा पराजय झाला असें नाहीं. ती सर्व फौज तेथून निघून मात्र गेली. यादवराव भास्कर नामें शिंद्याचा एक नामांकित सरदार होता तो मारलागेला.

१७ यानंतर जनरल वेल्सली शिंद्याचे पाठीस लागला, आणि स्टिफिन साहेबानें शिंद्याचे खानदेशांतील किल्ले अशीरगड व बऱ्हाणपूर हे घेतले. त्या समयीं शिंद्यानें येशवंतराव घोरपडा यास वेल्सली साहेबाकडे तह्‌ा विषयीं बोलण्यास पाठविलें होतें. हें बोलणें चाललें असतां तारीख २९ अकटोबर रोजीं शिंद्याचे व इंग्रजाचे फौजेची गांठ आरगांवा जवळ पडली. तेथेंही शिंद्याची फौज आपल्या ३८ तोफा टाकून पळाली. मग दोन्ही फौजा फिरत होत्या. शेवटीं सन १८१३ च्या दिसेंबराचे ३० वे तारखेस जनरल वेल्सली व शिंद्याकडील येशवंतराव घोरपडे व विठ्ठलमाहादेव आणि मुनशी कमलनयन यांजमध्यें सरजेअजिणगाव मुक्कामीं तहनामा झाला. त्यांत असें ठरले कीं, भागीरथी व यमुना या दोन नद्यांचे मधला मुलूख, जयपूर, जोतपूर, गोहद याचे उत्तरेकडचा मुलूख, भडोचचा किल्ला आणि तो प्रांत इतके इंग्रजास द्यावे, आणि अहमद नगरचा किल्ला व त्याखालचा मुलूख पेशव्यास देऊन अजिंट्या पासून गोदावरी

शिंद्याची मागील सर्व वर्तणूक वाईट ठरवून ता. ४ एप्रील १८०५ रोजीं निषेध पूर्वक त्यास एक पत्र लिहिलें.

२१ शिंदा सागराहून आपली फौज व कांहीं पेंढारी घेऊन भरतपुरास जाण्यास निघाला. तो ता-२९ मार्च रोजीं सबळगडास पोंहचला. आणि तेथून कांहींसा पूर्वेस गेला, तेथें त्याचा कारभारी अंबुजीइंगळा तो त्यास मिळाला, आणि पुढें भरतपुरास जावयास निघणार, तों रेसिडेंटानें याची भेट घेऊन भरतपुरास न जाण्याबद्दल कांहीं द्रव्यदेऊं केलें, व माळव्यांत जाऊन होळकराचें राज्य घेण्याविषयीं सांगूं लागला. तेव्हां शिंद्यानें आपण तेथेंच राहून आपल्या सरदाराबरोबर मोठी फौज देऊन त्यास भरतपुरास रवाना केलें. तो तेथें गेल्यावर जनरल लेक यास आपण मध्यस्थ होण्यास आलों असें कळविलें; परंतु जाटलोकानीं इंग्रजाचा पक्ष धरून होळकरास त्या पूर्वींच तेथून त्याचे फौजेनिशीं घालविलें होतें. यामुळें तो जाऊन शिंद्याचे सरदारास मिळाला. नंतर ते दोघेही सबळगडास परत आले, आणि शिंदा व होळकर एकत्र राहिले. मग होळकरानें अंबुजीइंगळ्यावर पैक्याकरितां बहुत जुलूम केला.

२२ इतक्यांत शिंदा, इंग्रजाचाशत्रु जो होळकर त्याशीं मिळून रहातो, ह्मणून रेसिडेंटानें जाण्याची रजा मागितली, ती शिंदा देईना. आणि होळकरानें जास्ती उपद्रव देऊंनये ह्मणून त्यास ठेविलें आहे, अशी त्याची समजूत करूं लागला. इतक्यांत जनरल लेक ज्यास लार्ड हें पद नवानिच दिलें होतें, तो या दोघांचेही फौजेवर चाल करून आला. सबब ही सगळी फौज ता० २८ एप्रिल रोजीं सोलापुराकडे जाण्यास निघाली. ती कोठ्यावरून अजमिराकडे चालली. नंतर उन्हाळा व पाऊसकाळ समीपआला सबब लार्डलेक मथुराएथें छावणी करून राहिला.

२३ या नंतर सरजेराव घाडग्यास दवलतरावानें कारभारांतून दूरकरून त्याचे जागीं अंबुजीइंगळ्या यास आपला दिवाण केला तेणें करून मुनशी कमलनयन, जो घाडग्याचे द्वेषास्तव दिल्लीस जाऊन राहिला होता, तो ही दोन्ही सरकारांतील बखावतीची तोडजोड करण्यास लार्डलेक यांजकडे मथुरेस गेली. इकडे कलकत्याचा मुख्यसाहेब लार्डवेल्सली हो जाऊन त्याचे जागीं लार्ड कार्नवालीस नामें नवा साहेब आला. त्याणें शिंद्यास ग्वाल्हेर व गोहद हीं देऊंकेलीं. यामुळें शिंद्यानें आ-

पला मतलब पूर्णझाला, असें समजून तहकरण्यास राजीझाला. आणि लार्डलेक सांगत होता त्या प्रमाणें रेसिडेंटास शिंद्यानें आपले दरबारांतून जाऊंदिलें. पुढें नवंबर महिन्याचे २२ वे तारखेस मुनशी कमलनयन व सुरजान मालकम यांचे विद्यमानें मथुरा मुक्कामीं तहठरला. त्यांत सरजे आंजीण गांवच्या तहांत कांहीं फेरफार करून थोडीशीं नवीन कलमें झालीतीं अशीं; शिंदा व इंग्रज यांचे राज्याची सीमा उत्तरेकडील चंबलानदीचे पश्चिमेस कोट्यापासून पूर्वेस काली सिंध व चंबला यांचे संगमापर्यंत असावी. गोहदचे राण्यास इंग्रजांनीं दुसरा मुलूख* द्यावा, व मागील तहा प्रमाणें आपल्या लोकांच्या तर्फेनें पंधरालक्ष रुपये न मागावे, व इंग्रजांनीं शिंद्यास प्रतिवर्षी साडेचार लक्ष रुपये नगदी द्यावे. या शिवाय आपल्या बायकोस दोनलक्षांची व लेकीस एकलक्षाची त्यांणीं आपले मुलखांत जाहागीर द्यावी; व ग्वाल्हेरचाकिल्ला जो मागें इंग्रजांनीं आपणाकडे ठेविला होता तो शिंद्याकडे असावा. आणि सरजेराव घाडग्यास आपल्या दरबारांत शिंद्यानें ठेऊं नये.

* शिंद्यास चंबला नदीचे उत्तर काठीं बाडी, धोलपूर, व राजाखेडा हे तीन परगणे बादशाहकडून इनाम होते, ते हल्लींच्या तहा अन्वयें सुटले, तेव्हां हे इंग्रजांनीं गोहदच्या राण्यास दिले. तेव्हां पासून त्या राण्यानें आपलें राहाण्याचें स्थान धोलपूर केलें, आणि त्यास धोलपूरचा राणा ह्मणूं लागले.

# भाग ८.

सन १८०५ च्या अखेरीस शिंद्यानें इंग्रजांशीं मथुरा मुक्कामीं तह ठरविल्या-वर पुढें दोन वर्षें पर्यंत उभय सरकारांची एकमेकांत घेण्या देण्याची व्यवस्था चालली होती. तींत दवलतराव इंग्रजांकडे वरील तहनाम्याच्या तारखे पर्यंत मागील करारा प्रमाणें सालाबादी देणग्या बद्दल वगैरे चोवीस लक्ष रुपये मागे. आणि इंग्रज लोक शिंद्याकडे, त्याणें हवालीं केलेल्या प्रांतांचा वसूल करण्याकडे झालेला खर्च व अगाऊ दिलेला पैका, आणि शिंद्याचे फौजेनें इंग्रजांचे रेसिडें-टाचा सरकारी व खासगी माल मागें लुटला, त्या सर्वां बद्दल अठ्ठावीस लक्ष रुपये जोडून त्यांतून शिंद्याचें देणें वजा करून चार लक्ष रुपये फाजील बाकी, उलट मागत असत; परंतु अखेरीस इंग्रजांनीं आपलें घेणें सोडून देऊन उलट ६३००० रुपये शिंद्यास देण्याचें कबूल केलें.

२ इंग्रजां कडून येण्याच्या ऐवजाबद्दल त्यांणीं हा जमाखर्चाचा तपशील सांगितला. येणें करून दवलतरावास बहुत वाईट वाटलें असावें. कारण त्या समयीं तो फौजेच्या लोकांचें चढलेलें वेतन देण्याच्या मोठे अडचणींत होता. अशा स-मयीं शिंद्यानें ती आपली राहिलेली फौज उदेपूर, जोतपूर, व जयपूर, या राज्यां-कडे आपली मागील खंडणी वसूल करण्याकडे योजिली. ही फौज त्यासमयीं बहुत अव्यवस्थित होती, आणि तिला वेतन न मिळाल्या मुळें आपल्या सरदा-रांचा हुकूम न मानून जेथें जारी तेथें शत्रु मित्राचा अगदीं भेद न पहातां जिक-डे तिकडे लूट करून शिपाई लोक प्रजेस बहुत दुःख देत असत. असें असतां भोपाळाकडे कांहीं वर्तमान घडलें. तेव्हां त्याणें आपली कांहीं फौज तिकडे पाठविली.

३ भोपाळचा नबाब व शिंदा यांचा संबंध समजण्या करितां कांहीं मागील मजकूर सांगितला पाहिजे. सन् १७८२ च्या पूर्वीं महादजी शिंद्यानें इं-ग्रजांशीं लढाया केल्या. त्यासमयीं राघोगडाचा राजा बळवंतशिंग हा शिंद्याचा आश्रित असतां त्याणें इंग्रजांस मदत केली. त्यावरून महादजीनें राघोगड घे-

घला. त्यालढाईंत बळवंतशिंग मारला गेला. पुढें शेरशिंग नामें त्याच जातीच्या ठाकुरानें मराठ्यांचा सूड उगविण्या करितां बंड केलें. आणि दक्षिणेंतून जाणाऱ्यां येणाऱ्या मराठी लोकांस व विशेषें करून ब्राह्मणास तो अत्यंत उपद्रव देऊं लागला. त्यासमयीं महादजीशिंदा मथुरेस होता. आणि त्याची एक राणी दक्षिणेंतून मथुरेस जाण्यास येत होती, ती माळव्यांत आल्यावर तिच्या बरोबरच्या पाळेगारांस शेरशिंगाच्या उपद्रवामुळें पुढें जाण्याचा धीर होईना तेव्हां त्यांणीं भोपाळच्या नवाबाचा दिवाण छताखान याची मदत मागितली. ती त्याणें देऊन शेरशिंग जो या दिवाणाच्या आश्रयानें वागत असे, त्यालाही उपद्रव न देण्याविषयीं सांगितलें. तें त्या बंड खोरानें मान्य केलें. ती राणी मथुरेस सुरक्षित पोंहचल्यावर छताखानाची तिणें आपल्या भ्रतारापाशीं बहुत उपकार दर्शक वाहवा केली; व महादजीनेंही पुढें त्याचा बहुमान होण्यासाठीं पोषाख वगैरे पाठविला. यानंतर भोपाळ वाले मराठ्यांचे आश्रितराजांप्रमाणें वागूं लागले. परंतु यापुढें भोपाळचा दिवाण वजीरमहमद याजला दवलतराव शिंद्यानें होळकराशीं लढाई करण्यास बोलाविलें, परंतु तो आला नाहीं. ही गोष्ट दवलतरावाच्या मनांत होतीच. इतक्यांत असें झालें कीं, हयातमहमद जो भोपाळास केवळ नांवाचा मात्र नबाब होता, त्याचा पुत्र गोसमहमद हा वजीरमहमदाच्या दिवाणगिरीचे अधिकाराची स्पर्धा करूं लागला. आणि पेंढाऱ्याचा सरदार करीम याचें सहाय घेऊन त्याणें वजीरमहमदास कामांतून काढण्याचा उद्योग केला, परंतु तो फसला. त्या समयीं शिंदाही जवळच होता, सबब ते त्याचे आश्रयास आले. आणि गोसमहमदानें आपणास अधिकारावर स्थापण्या बद्दल शिंद्यास इसलामनगर देऊं केलें. याशिवाय चारलक्ष रुपये नगदी आणि पन्नासहजार रुपये सालीना देण्याचा करार केला. यानंतर शिंद्यानें आपली फौज पाठवून वजीरमहंमदास घालवून गोसमहंमदास अधिकारावर स्थापिलें. आणि त्याचा बाप हयातमहंमद होही वारल्यामुळें वजीरमहंमद आपलें कांहीं चालणार नाहीं असें समजून तोही गनुरास गेला.

४ इकडे शिंद्याच्या दरबारांतही बराच फेरफार झाला, मथुरा एथें झालेल्या तहा पूर्वीं सरजेराव घाडग्यास शिंद्यानें काढून दिल्यावर अंबुजी इंगळा यास मु-

स्थ कारभारी केलें. त्याजवर जरी मालकाची कृपा असे, तरी पहिल्या कारभारी मंडळीचा हा शत्रु होता, सबब कांहीं हानी होईल असें त्यास वाटून आपला अधिकार दृढकरण्यास्तव त्याणें सरजेराव घाडगे यास, शिंद्याचे लश्करांत माग-च्या तहनाम्यीं प्रमाणें इंग्रजां कडून मनाई होती, ती गवरनर जनरलचे आज्ञे-नें दूरकरून, बोलाविलें. परंतु या दोघांनींही पुढें बहुत दिवस कारभार केला अ-सें नाहीं. अंबुजी इंगळा सन १८०९ च्या आरंभींच शिकरवारी इलाख्यात एक शिकरोदा नामें कुवारी नदीच्या कांठचे गांवीं मृत्यु पावला. याचे मरणा नंतर ग्वाल्हेरचा किल्ला व शहर जें त्याचे स्वाधीन असे, तें दवलतराव शिंद्यानें आपणाकडे घेतलें. त्या काळापासून शिंद्याचे लश्करास शहराचा आका-र दिसूंलागला, आणि या ग्वाल्हेर नजीक नवीन वसविलेल्या शहरास शिंद्याचें लश्कर असें म्हणूं लागले.

५ पुढें सरजेराव घाडगाही त्याच वर्षांत मारला गेला. तो प्रकार असा, एकेदिवशीं सरजेराव दवलतरावाजवळ जाऊन कांहीं कामा बद्दल हुकूम मा-गत होता. परंतु त्याचे मनांत तें करण्याचें नसल्यामुळें स्पष्ट उत्तर देण्याची टाळा-टाळ करून तो हत्तीचे लढाईस जाण्याची तयारी करून बाहेर निघाला. तो सरजे-रावानें आपणास उत्तर मिळण्यासाठीं दवलतरावाच्या आंगरख्याचा पदर धरून बसवूं लागला. तेव्हां जवळ हुजरे होते, त्यांस तें सहन न होऊन त्याणीं त्यास मा-गें ढकलिलें. इतक्यांत दवलतराव सरजेरावास कैद करण्याचा हुकूम देऊन आपण दूरझाला. त्या समयीं तो आपली तरवार उपसून कैदकरूं नदेतां मारामारी करू-न निघाला, तो छावणीच्या चावडीबाजारांत येऊन बसला. तेथें त्याचा पाठलाग करीत आनंदराव व मानाजीफांकडे हे देवडीवरून शिपाईघेऊन आले, आणि तो ब-सला होता त्या तंबूचे तनावे तोडले ,आणि तो बाहेर पडला तेव्हां त्यास धारराव शिं-दा याणें भाला लाऊन मारिलें. क्रूरकर्में करून लोकांस पीडा कशी द्यावी व स्वकीय जनास निर्दयतेनें कसें मारावें हें या पुरुषानें आपला पाय राज्यकारभारांत घातल्या दिवसापासून लोकांस बहुत प्रसंगीं शिकविलें होतें; सबब तशाच क्रूरकर्मांनीं हा-मारला गेला; यांत, व त्याजला धरून कैद कण्याचा हुकूम त्याचे जांवयानें दि-ला असतां, लोकांनीं त्यास ठार मारिलें यांत, कांहीं आश्चर्य नाहीं.

६ यानंतर दवलतराव याणें आपली फौज, कर्नल जेन बापटिस्ट फिलोज याचे हाताखालीं देऊन ग्वाल्हेरच्या आसपास लहानलहान राजे, जे नेहेमीं उपद्रव देत असत, त्यांस जिंकण्यास, व त्यांपासून खंडण्या वसूल करण्यास, लाविली. तेव्हां पूर्वींजो ग्वाल्हेरचे आसपास शिंद्याचा मुलूख होता, त्यास या सरदारानें आणखी जोडला. त्याणें प्रथम करोलीचे राजाशीं लढाई करून त्याजपासून सबलगडनामें लक्षरुपये वसूल येण्या जोगा मुलूख घेतला. त्यानंतर चंदेरीचे राजाचा सर्व मुलूख घेतला; परंतु शेवटी इंग्रजांचे मध्यस्थीनें ४०००० चा मात्र त्यास परत दिला. या पुढें त्याणें राघोगडचा काछीवारा ठाकूर याजपासून तीन लक्षांचा मुलूख घेऊन अवघा पन्नास हजारांचा मात्र परत दिला. तसाच इसागड एथीलें पुरातन-राजाचा दोन लक्षांचा घेऊन मुकुंद गडमात्र इंग्रजांचे मध्यस्थी करितां दिला; व इसागड हें शहराचें नवीननाव ठेविलें. यापुढें त्याणें सापूरवाल्या राजाचें राज्य घेऊन त्याजकडेचरितार्थ चालण्याकरितां पंचवीस हजारांचा बाकी ठेविला. मग या फौजेनें गढाकोटा घेतला.

७ मध्यंतरीं शिंद्याचे फौजेची व भोपाळवाल्यांची मोटी लढाई चालली होती. त्याचें कारण असें झालें कीं, गोसमहंमद भोपाळचे राज्याचा खरा मालक, याजपुढें आपलें कांहीं चालणार नाहीं ह्मणून वजीर महंमद तथील दिवाणगिरीचें काम सोडून गनुरह्मणून तथून वीस कोसांवर एक गांव आहे, तेथें राहण्यास गेला. नागपूरकर भोसल्याचे फौजेनें शिंद्याशीं मिळून भोपाळची वहिवाट आपणाकडे ठेविली होती, व इसलामनगरचा किल्ला शिंद्याकडे होता. असें असतां एके समयीं भोसल्याची फौज अव्यवस्थित आहे असें पाहून वजीर महंमदानें एकाएकीं येऊन भोपाळावर हल्लाकरून तो किल्ला व शहर घेतलें, आणि गोसमहंमदास हस्तगत करून त्याणें फितूर होण्याचें कारण त्यास विचारिलें. तेव्हां आपणास जवळच्या कांहीं लोकांनीं तसें करण्यास शिकविलें असें तो सांगूलागला, आणि त्या लोकांस याणें दाखवून ही दिलें. त्यासमयीं वजीरमहंमदानें त्या लोकांपैकीं दोघांस हत्तीच्यापाईंदिलें व दोघांस तोफेच्यातोंडीं दिलें, आणि दोघांस बलात्कारानें गाईचेंरक्त पाजून (तें हिंदुहोते, ह्मणून) त्याची रुची कशी लागत्ये ती शिंद्यास सांगण्यास त्याजकडे पाठविलें. हें त्याचें दुष्टकर्म पाहून शिंद्यास बहुत राग आला, आ-

णि त्याणें भोपाळ आपल्याकडे घेण्याचा उद्योग केला. इतक्यांत वजीरमहंमद याणें अन्याय पदरीं घेऊन गोसमहंमदानें शिंद्यास खंडणी देऊंकेल्याप्रमाणें पुढेंही देण्याची कबुलायत केली. परंतु पुढें त्याप्रमाणें तो देईनासा झाला; आणि पेंढारी लोकांस आश्रय देऊं लागला. सबब सन १८१२ मध्यें जगुबापू बरोबर मोठी फौज देऊन शिंद्यानें त्याला भोपाळावर पाठविलें. नंतर रामलालव कृष्णाभाऊ यांच्याही फौजा त्यास जाऊन मिळाल्या, आणि त्याणीं भोपाळ शहर व तेथील फत्तेगड नामें किल्ला यांस वेढाघातला. तेव्हां आंत धान्याची बहुततूट पडली. तत्रापि त्या शहराच्या बाजूस एक मोठें तळेंआहे, त्या वरून कांहींलोक चोरून रात्रीस नावेनें धान्य पोंहोंचवीत असत. ती गोष्ट अखेरीस शिंद्याचे सरदारास कळली; तेव्हां त्याणें तेथीलही बंदोबस्त केला. त्या समयीं आंतील लोक जे मुसलमान होते, ते जीं आंत जनावरें मरत तीं खाऊन वांचले, व हिंदु होते ते चिंचुके खाऊन जगले. त्या समयीं नागपूरवाल्यांकडून ही कांहीं फौज आलीहोती, तिचा सरदार मुसलमान होता, त्याला, असें ह्मणतात कीं, भोपाळवाले मुसलमान यांशीं न लढावें ह्मणून स्वप्न पडलें होतें. आणि हा वेढा घातल्यावर जगुबापूहीपुढें नऊ महिन्यांनीं वारला. यामुळें ही सर्व फौज सन१८१४ त सारंगपुरास येऊन तेथें छावणीकरून राहिली. पर्जन्यकाळ गेल्यावर जगुबापूचा पुतण्या यशवंतराव याणें भोपाळास पुनः वेढा घालण्याची तयारी केली. त्याचे मदतीस जेन बापटिस्ट फिलोज हाही आपले फौजेनिशीं जाऊन मिळाला. परंतु त्याच्या फौजेस खर्चाची अडचण पडली. ती दूर होण्या करितां त्याणें यशवंतरावाजवळ पैका मागितला, तो त्याणें दिलानाहीं. यामुळें या दोन शिंद्याच्या सरदारांचें आपसांत सिहोराजवळ युद्ध झालें. त्यांत यशवंतरावाचा पराभव झाला, आणि त्याणें त्या दिवशीं शत्रूकडे भोपाळास जाऊन आश्रय घेतला. परंतु त्याला तेलोकै दुसऱ्या फौजेच्या भयामुळें एक दिवसाहून जास्ती ठेवीतना ह्मणून तो तेथूनही पुढें निघूनगेला. बापटिस्ट याणें यशवंतरावाच्या १०२ तोफा घेतल्या. यापुढें बापटिस्ट याणें एकट्यानेंच भोपाळ शहर घेतलें असतें, परंतु वजीरमहमद यास त्या समयीं इंग्रजांनीं आश्रय दिला, यामुळें रेसिडेंटानें शिंद्याशीं मध्यस्थीकरून ती लढाई बंदकेली. यानंतर पुढें सन १८१८ मध्यें शिंद्याकडून इसलामनैगरही भोपाळच्या नवाबास परत देवविलें.

८ त्या समयीं मुलखांत पेंढाऱ्यांचा दंगा विशेष माजला होता. त्याचा मोड करण्याचें इंग्रजांनी इच्छिलें, परंतु तें तडीस गेलें नाहीं. त्यांपिकीं कित्येक लोक शिंद्याचे आश्रयास असत. मागें नेपाळास लढाई चालली होती, तेव्हां दवलत-रावानें इंग्रजांचे शत्रूशीं कांहीं मेळ ठेविला, असें हे लोक ह्मणत. याशिवाय द-क्षिणेंत बाजीरावाशीं सन १८१७ त लढाई सुरूझाली. तींत दवलतराव कोणी-कडे होईल याचा इंग्रजांस विश्वास येईना. सबब त्या वेळेचा गवरनरजनरल लार्ड हेस्टींग हा हिंदुस्थानांत फिरावयास निघाला. तो पेंढाऱ्यांचा बेदा मो-डण्याचे तजविजीकरितां कालपीजवळ यमुना उतरून पुढें शिंद्याचे मुलखांत प्रवेश करणार, त्या समयीं दवलतरावाजवळून पेंढाऱ्यांस आश्रय न देण्या विषयीं व बाजीरावाचे लढाइंत त्यास सामील न होतां पेंढाऱ्यांचा बेदा मोडण्यास आप-णास सामील होण्या विषयीं कराकरवून पांचहजार फौज त्यापासून मागून घे-तली. याप्रमाणें चांदपूर सोनारी मुक्कामीं तेथील रेसिडेंटकर्नल क्लोझ याणें तह ठरविला.

९ या वरील ठरलेल्या तहनाम्यामध्यें पेंढारी व नागपूरकर आपासाहेब यां-शीं लढाई चालू आहे पर्यंत अशीरगड किल्ला इंग्रजांचे हवालीं असावा असें ठरलें होतें. त्याप्रमाणें तेथील किल्लेदार यशवंतरावलाड याचे नांवें तो किल्ला हवालीं कर-ण्या विषयीं शिंद्यांनें सोडचिट्ठी दिली. परंतु असें दिसतें कीं, नागपुरकर आपासाहेब त्या किल्यांत पूर्वींच येऊन आश्रयास राहिले होते, यामुळें तो शिंद्याची आज्ञा न-मानून लढूंलागला. तेव्हां इंग्रजांनीं तेथें इंदुराकडून सरजानमालकम या बरोबर, व तशीच कांहीं दक्षिणेंतून अशीरगडास फौज आणून त्यास वेढा घातला. तेव्हां पुढें लढाई होऊन सन १८१९ च्या मार्च महिन्याचे २९ व्या तारखेस यशवंतरावा-नें तो किल्ला इंग्रजांचे स्वाधीन केला. त्यासमयीं त्यांत आपासाहेब नवते, आणि असेंही वाटतें कीं, त्या आपासाहेबांस युक्तीच्या वाटेनें बाहेर काढून दिल्यावर तो किल्ला त्याणें त्यांचे हवालीं केला.

१० या पुढें शिंद्यांच्या राज्यांत बरीच स्वस्थता राहिली. महादजी महाराजां च्या विधवा स्त्रिया, ज्या यांच्या मागें दक्षिणेंत भटकत फिरत होत्या, त्याही शिंदा हिंदुस्थानांत आल्यावर जामगांवीं जाऊन राहिल्या.

११ यानंतर सन १८२७ यावर्षी गवरनरजनरल आग्र्यास ज्यानुआरी *महिन्यांत आला. तेव्हां त्यास भेटण्यास हिंदुरावबाबा यास पाठविलें. त्यासमयीं दवलतरावाची प्रकृति अतिशय विघडली होती. सबब पुढें गादीसें वारस नेमण्या विषयीं तो आग्रह करीत होता. परंतु त्यासमयीं त्यांणीं नेमला नाहीं. याचें कारण असें दिसतें कीं, आपण वारस नेमला आसतां आपली स्त्री बायजाबाई इच्या अधिकार चालणार नाहीं, यामुळें त्याणें तसें केलें नाहीं. त्यानंतर दवलतराव सन इसवी १८२७ यावर्षी मार्च महिन्यांत फाल्गुन वद्य ९ रोजीं प्रथम दीडप्रहर दिवसास निपुत्रिक वारला.

१२ दवलतराव शिंद्यास लहानपणीं मोठा अधिकार प्राप्त झाला, यामुळें त्याच्या जवळच्या कित्येक गैरमसलती लोकांनीं त्याला अनुचित कर्मास प्रवृत्त केलें. या विषयीं त्याला दोष देतां येतनाहीं. परंतु पुढें त्याणें आपल्या सासऱ्यास मुख्य कारभार सांगितला; हें त्यासमयीं मराठीलोकांचे पद्धतीस अयोग्य होऊन त्या दुष्ट मनुष्याचे विचारें दवलतराव चालला. त्या योगें महादजी शिंद्यानें मराठी मंडळांत राखलेला भाईचारा अगदीं लयास गेला. आणि सरजेरावाच्या दुष्टकर्माचें फळ असें झालें कीं, शिंदे व होळकराची आपसांत लढाई होऊन पुढें त्याचा परिणाम, इंग्रज व शिंदे यांची लढाईझाली. तींत दवलतरावाची हानी झाली. या नंतर दवलतरावानें पुरातन भाईचारा जोडण्यास पुनः प्रयत्न केला होता, परंतु तो व्यर्थ गेला. त्याणें आपल्या सरदारांस फौजखर्चास मुलूख लाऊन दिलेला असे, त्यामुळें ते सरदार त्याचा कधींकधीं हुकूम न ऐकतां मनास येईल तसें प्रजेस दुःख देत असत. हा कामातुर बहुत असून स्वभावाचा थंडा होता. इंग्रजांच्या महत इच्छा शमनार्थ जरी दवलतरावास आपल्या राज्याचा कांहीं भाग त्यांसें देण्याचें अगत्य पडलें, तरी हा राजकीय मसलतींत, तसाच स्वभावानें व शूरपणांत कमती होता असें नाहीं, आणि त्याचे कारकीर्दींत जीं कित्येक भित्रेपणाचीं दुष्टकृत्यें घडलीं, तीं हा सरजेरावाचे मोहांत पडल्यामुळें घडलीं. दवलतरावशिंदा भाला लावण्यामध्यें बहुत कुशल असे. त्याणें आपल्याराज्यांत स्वस्थता झाल्यावर राज्यांतील वसुलाचें व त्याच्या व्यवस्थेचें काम पारखजी नामें एक मारवाडी जातीचा वाणी असे त्याजकडे सांगितलें होतें.

* पुरवणी पहा.

# भाग ८ वी पुरवणी.

---

दवलतराव महाराज शिंदे वारले त्या संबंधी मेजर स्टूअर्ट ग्वाल्हेरचा रेसिडेंट याणें रिपोर्ट केला आहे, त्यांतील कांहीं सारांश या ठिकाणीं असणें हें इतिहासास योग्य समजून एथें घेतला आहे :—

"रेसिडेंट" तारीख २२ मार्च सन १८२७ रोजीं लिहितो कीं, काल सकाळीं आठवाजतां लश्करांहून एकस्वार हिंदुराव बाबाकडून निरोप घेऊन भरधांव आला, आणि महाराजानीं मोठ्या उत्सुकतेनें भेटण्यास बोलाविलें आहे, तर आपण त्वरेनें वाड्यांत चलावें असें मला ह्मणूंलागला. तेव्हां महाराज अगदीं अस्थावस्थ झाले असतील अशी कल्पना करून निरोप पोंहचल्यावर मी लागलाच कपतान डाईक यास मात्र बरोबर घेऊन महाराज वाड्यांत येऊन पोंहचलों, तों तेथें बाहेरच्याबाजूस बहुत लोकांची दाटी व वाड्यांत जेथेंतेथें सरदार व आणखी सभ्य गृहस्थ जमलेले पाहिले. पुढें हिंदुराव भेटल्यावर तो ह्मणाला कीं, महाराज बहुत आजरी आहेत. त्यास तुह्मी लवकर भेटावें. हें बोलणें होत आहे इतक्यांत माझी येण्याची खबर आंत जाऊन, महाराज मला भेटण्यास सिद्ध आहेत असा निरोप आला. तेव्हां मी महाराज आंत होते त्या खोलींत हिंदुराव बाबा, रावजी खासगीवाला, आणि आत्माराम पंडित व याशिवाय एकदोन असामीस बरोबर घेऊन आंत गेलों. कपतान डाईकही मजबरोबर आला. त्या समयीं महाराज तक्यासीं टेकून पलंगावर कलंडून बसलेले होते व सभोंवतीं कांहीं कुळंबिणीं उभ्याहोत्या, आणि पाठीमागें पडद्याआड बायजाबाई, रखमाबाई, व बाळाबाई, या बसलेल्या होत्या. त्या समयीं महाराजांची चर्या बदलली व हात अचेतन होऊन पाय वगैरे बहुत सुजले होते. हें पाहून मला धक्का बसला.

मी त्यांजवळ जाऊन आपल्या हातांत त्यांचा हात धरला, आणि ते काय ह्मणतात तें ऐकूं लागलों. तेव्हां ते अशक्तिमुळें अमळ उगाच राहिले, आणि शेवटीं सर्वांस ऐकूं येण्याजोगें स्पष्ट शब्दांनीं बोलले कीं, तुह्मास जसें योग्य दिसेल तसें तुह्मीं करावें. त्यावर मी जबाब दिला कीं, महाराजांच्या इच्छे प्रमाणेंच सर्व

होईल. आणि शांतवन करण्यासाठीं आपण अजून बरे व्हाल असें ह्मटले. त्यांचे जबाबांत त्यांणीं " आपल्यास पाहिल्यानें व आपल्या कृपेनें " इतकें मात्र ह्मटलें. परंतु ते वाक्यपुरें करूं सकले नाहींत. या नंतर बहुतवेळ उगाच राहिले, आणि मला कांहीं आणखी सांगणार आहां काय ह्मणूनमी विचारल्या वर "बहुत सांगणं आहे असें ह्मणाले" परंतु त्यानंतर बहुतवेळ वाट पाहिली तरी कांहीं बोललेनाहींत. तेव्हां महाराज पुनः बोलण्यास शक्तिमान होईत पर्यंत मी दुसऱ्या जाग्यांत जातों असें ह्मटलें, तें सर्वांनीं कबूल केलें. पुढें मी बाहेर जाण्यास निघतों इतक्यांत बायजाबाईनें डाक्टर पांटन साहेबास बोलावणें पाठविण्या विषयीं सुचवितांना ऐकिलें. तेव्हां महाराज साहेब त्यास बोलाऊं इच्छितात काय ह्मणून विचारल्यावर तसें करण्या विषयीं म्लान पणानें खूण केली.

महाराज जे शेवटचे शब्द बोलले ते तपशीलवार लिहिलेच आहेत. मी बाहेर येऊन एकतास झालानाहीं इतक्यांत बायकांची आरोळी ऐकूं आली. तेव्हां प्राणगेला असें समजलें.

यापुढें जो देखावा घडून आला तो ठीक रीतीनें वर्णन करणें कठीण आहे. बायकांचा आक्रोश व पुरुषांचा शोक. तसाच गोंगाट आणि गवगवा अवर्णनीय होता.

या नंतर बायजाबाई शव दहनाचे ठिकाणीं जाणार होती. तिजला मनाई करण्या विषयीं बोलण्यास मी तिजपाशीं गेलों. तेव्हां तिच्या व माझ्यामध्यें बारिक वस्त्राचा लहानतुकडा धरून बोलणें झालें. त्या समयीं मी तिजला तिच्या खोलींत जाण्या विषयीं निक्षून सांगितलें. तेव्हां कुळंबीणीनीं तिला तिकडे नेलें. या नंतर लवकरच एक सात कलमाची याद आणिली. तिजवर महाराजांची सही नवती. तींत मतलब इतकाच होता कीं, " मुलगा दत्तक घ्यावा, हिंदुरावानें देखरेख करावी, व दुसऱ्या कोणा एकास मुखत्यार नेमावें. या शिवाय पुढें सरळवंशांत पुत्र जन्मल्यास तो गादीचा वारस व्हावा, आणि दत्तकानें बाईची व महाराजांची जीवंत आहे पर्यंत आज्ञा पाळावी. या गोष्टीस इंग्रजांनीं सहाय करावें."

महाराजांस बाहेर नेलें तो एक विलक्षण देखावा होता. त्यांला जिवंतपणा सारखीं वस्त्रें नेसवून रत्नें व मोत्यें यांचे अलंकार घातले. आणि तोंड उघडें ठे-

ऊन पालखींत बसविलें, व पुढें हत्ती, आणि कोतवाल घोडे काढून या शेवटच्या बोळाव्यास निघाला. त्याज बरोबर लष्करांतील बहुतकरून सर्वलोक गेले, आणि त्या जमावाच्या अश्रुपातांनीं दाखविलें कीं, यांजमध्यें, राज्य करण्याचे कांहीं गुण-जरी कमी होते तरी तो दुष्ट किंवा जुलमी राजा नवता. महाराजांची समजूत कमी नवती, या मुळेच मोडलेलें मराठीराज्य त्यांणीं बचाविलें होतें. हे बोलण्यांत उदाहरणाची साम्यता उत्तम करीत. यांचा स्वभाव नम्र, आतिसभ्य, व शूर असे त्यांचीं वाईट कर्में त्यांचे वाईट मसलत दारांकडे लाविलीं पाहिजेत. कारण अलीकडच्या काळांत त्यांणीं नीतीचें उलंघन केल्याचें आढळण्यांत येत नाहीं.

---

## भाग ९.

मागील भागांत सांगितल्या प्रमाणें दवलतरावशिंदा निवर्तल्यावर बाय जाबाईनें एक सात कलमांचें मृतपत्र पुढें आणिलें; त्याजवर दवलतरावाचा शिक्का झालेला नवता, परंतु जवळच्या लोकांनीं ती कलमबंदीची याद दवलतरावाचे समक्ष ठरली असें मान्यकेलें. तींत मुलगा दत्तक घेऊन राज्य कारभाराचें काम बायजा बाईनें मुकत्यागीनें चालवावें असें होतें, सबब त्यासमयीं दक्षिणेनून दूरच्या संमंधाचे पांच मुलगे पूर्वींच आणून ठेविले होते, त्यांपैकीं एक मुगुटराव या नांवाचा अकरा वर्षांचे वयाचा मुलगा होता, तो दत्तक घेण्याचा नेम ठरला. हा शिंद्याचे घराण्यांत प्रथम प्रख्यातीस आलेला जो राणोजी शिंदा याचा भाऊ. चांगोजी नामें मूळपुरुष असे त्याचा कनिष्ट पुत्र रोडजी, त्याचा पुत्र नागोजी, त्याचा पुत्र कोंडोजी, त्याचा पुत्र पाटलोजी, त्याचा पुत्र मुगुटराव होय. बायजा बाईनें आपली वडील मुलगी गुणवंता बाई बापू साहेब सेनापति यांस दिली होती, तिच्या जयाराजा नामें कनिष्ठ कन्येशीं मुगुटरावाचें लग्न केलें. पुढें जून महिन्याचे १८ वे तारखेस म्हणजे जेष्ठ वद्य ७ शके १७४९ यादिवशीं सर्व सरदार व इंग्रजाकडील रेसिडेंट मेजर स्टुअर्ट याच्या संमतानें दत्त विधान पूर्वक दवलतरावाची वडील स्त्री जी रखमाबाई तिचे ओटींत मुगुटरावास दिले; व जनकोजी महाराज असें नामाभिदान देऊन त्यास गादीवर बसविले, आणि बायजाबाई राज्याचे सर्व काम पाहूं लागली. हा या शिंद्याच्य कुळांत दुसरा जनकोजी होय.

२ हें दत्तविधान झाल्यावर लागलाच इंग्रज सरकाराशी कांहीं देण्याघेण्याचा वाद उद्भवला. तो असा, सन १८०५ च्या सालीं शिंदे व इंग्रज यांचा तहनामा ठरला होता, त्यांत चार लक्ष रुपये नगदी इंग्रजांनीं दवलतरावास द्यावे असें ठरलें होतें. ही देणगी वंशपरंपरेने चालावयाची अशी शिंद्याकडील लोकांची समजूत होती, परंतु तहनाम्याचें करारपत्र पारशी लीपींत ठरलें होतें, त्यांत कलम वहांहयातीचा होता, त्याकडे कोणी लक्ष दिलें नवतें. आणि इंग्रजांनीं वर करारनाम्या प्रमाणें ते रुपये देणें बंद केलें. हे रुपये इंग्रज लोक शिंद्याकडून

जें आपणास ( कांटिजेंटी ) फौज खर्चा बदल रुपये येणें, त्यांतून वजाकरीत असत. आणि त्याच्या मरणा नंतर त्यांणीं तें देणें बंद करून घेणें मात्र मागूं लागले. तेव्हां बायजाबाईनें निरुपाय होऊन ऐंशी लाख रुपये इंग्रजी खजिन्यांत अमानत ठेविले, आणि त्या रकमेच्या पांच रुपये शेंकडा व्याजांतून कांटिजेंटीचा खर्च इंग्रजांनीं भागवावा असें ठरलें.

३ बायजाबाई राज कारभारांत बहुत दक्ष व शाहाणी असे. दरबारी लोकांवर हिचा दरारा विशेष असे, असेंही असतां हिणें आपले हाताखालीं काम करण्या करितां रावजी त्रिंबक नामें इंदुरास तात्या जोग याचे हाताखालीं वागणारा गृहस्थ असे त्यास बोलाविलें. आणि तो व आपला भाऊ हिंदुराव यांच्या विचारें ती काम करूं लागली. पुढें कांहीं दिवसांनीं रावजी त्रिंबक वारला, तेव्हां त्याचे जागीं सखो शामजी व दादा खासगीवाले काम करूं लागले.

४ बिंतोडीचे वेळीं बायजाबाईनें जनकोजी शिंद्यास दत्तक घेतलें, आणि दवलतरावानें सांगितल्या प्रमाणें आपण जन्मवर राज्य चालवीन असा मनांत निश्चय करून दत्तक घेतलेल्या मुलास आपल्या जवळ शिक्षणांत ठेविलें. हा मुलगा तारुण्यावस्थेंत येतांच आपल्यास वैभवास आणणारीचे विचारें न वागतां कांहीं कूमार्गी व आपस्वार्थी लोकांची संगत धरून त्या बाईच्या शिक्षणांतून मुक्त होण्याची इच्छा करूं लागला. त्यासमयीं जनकोजी शिंद्यास अनुपकारी पणाचे मार्गास लाविणारे व कांहीं नवेंजुनें होऊं इच्छिणारे लोकांनीं त्याचा पक्ष धरिला. इंग्रज लोकांचाही याच संधीस नवा राजा गादीवर बसला, त्याचे नांवच्या हरएक सरकारी कागदावर शिक्का झाल्या खेरीज तो कागद कोणत्याही प्रकारें ते दस्त ऐवजांत खरा मानीनातसे झाले. तेव्हां जनकोजी शिंद्याचे पक्षकारांस अधिक वळकटी आली, आणि बायजा बाई पासून त्याला दूर करण्याचा त्यांणीं विशेष प्रयत्न मांडिला.

५ इतक्यांत बायजा बाईनें एक मसलत केली ती अशी कीं, यासमयीं सेनापतीची कन्या म्हणजे बायजा बाईची नात—जीशीं जनकोजी शिंद्याचें, गादीवर बसण्या पूर्वीं, लग्न झालें होतें—ती वारली. नंतर त्याचें दुसरें लग्न यशवंतराव घोरपडे, याचे कन्येशीं होऊन तिचें नांव ताराबाई असें ठेविलें. सबब जनकोजीचा व

आपला कांहीं विशेष संबंध राहिला नाहीं, व दवलतरावांनें मरत्येवेळीं आपल्या घराण्यांत सरळ वारस पुढें निपजला असतां दत्तक घेतलेल्या मुलास एकीकडे ठेवून त्याची योग्यसंस्था मात्र करून द्यावी, आणि सरळ वारसास गादीवर बसवावें, असें सांगितलें होतें. व त्यासमयीं बायजाबाईची दुसरी मुलगी चिमाबाई आपासाहेब पाटणकर यांस दिली होती, ती गरोदर होती सबब तिला जो पुत्र होईल त्यास गादीवर बसवून जनकोजीस पदच्युत करावें असें योजिलें. आणि ही गोष्ट घडून येण्यास तिणें इंग्रज लोकांचें सहाय मागितलें. परंतु ते या गोष्टीस अनुकूळ न होण्याचें निमित्य सांगूं लागले कीं, सर्व सरदारांनुमतें जनकोजी एकवेळ गादीवर बसला त्याला दूर करतां येत नाहीं.

६. पुढें बायजाबाईनें जनकोजीस बहुतच प्रतिबंधांत ठेविलें, व पहारेकरी लोकही त्याशीं बहुत मगरूरी करूं लागले. तेव्हां एकेदिवशीं जनकोजी बायजाबाईस न कळवितां वाड्यांतून निघून रेसिडेंटाचे आश्रयास गेला, त्यासमयीं दोघांचे मध्यस्थीनें त्याला बायजाबाईकडे वाड्यांत आणिलें. परंतु सन १८३२ सालीं हिंदुस्थानचा गवरनरजनरल लॉर्ड बेंटिक हा प्रांतांत फिरावयास निघाला, त्यावेळीं तो ग्वाल्हेरचा जनकोजी शिंदा व बायजाबाई यांस भेटण्यास आला. तेव्हां हीं दोघेंही त्याजला चंबळा नदीवर सामोरीं गेलीं होतीं. त्यांच्या उत्तर तीरावर भेटी होऊन त्यावेळीं बांधलेल्या नावांचे पुलावरून उतरतांना जनकोजी शिंदा गवरनरजनरलचे हत्तीवर त्याचे बरोबरीनें जाऊन बसला. त्यासमयीं त्याला आपलें कांहीं गाऱ्हाणें गवरनरजनरल याजपाशीं एकांतीं बोलण्याचा प्रतिबंध होण्याकरितां बाईनें वेळेच त्या दोघांचेही मागें खवाइयांत कोणी एक बापू या नांवाच्या गृहस्थास बसाविलें होतें. यानंतर त्या दोघांनींही आपापला पक्ष गवरनरजनरल यांणें धरावा ह्मणून बहुत आग्रह धरिला. परंतु इंग्रजलोक त्याकाळीं हिंदुस्थानच्या राजांचे आंतील कारभारांत विशेष मन घालीत नसत. यामुळें गवरनरजनरल यांणीं कोणाचाच त्यासमयीं पक्ष उचलला नाहीं, व त्यांचा आपसांतील कज्जा तोडण्याचीही कांहींच तजवीज केली नाहीं. यानंतर ग्वाल्हेरीस दोन्ही पक्षांचे लोक बहुत भांडूंलागले. तेव्हां बायजाबाईनें गवरनरजनरल यांस एक पत्र असें लिहिलें कीं, इंग्रजांनीं आपल्यास

ग्वाल्हेरची मुखत्यारी दिली तिचें त्यांनीं रक्षण करावें, आणि आपण दिलेल्या मुखत्यारीचे रक्षणास जर ते मदत करीत नाहींत, तर ही त्यांस लाजिरवाणी गोष्ट आहे. परंतु या बायजाबाईच्या गऱ्हाण्याकडे गवरनरजनरल याणें अगदीं लक्ष न देतां इतकें मात्र सुचविलें कीं, या आयुष्यांत कोणतीही स्थीति अचल नाहीं, तस्मात आलेल्या भोगास शरण जावें. यावरून जनकोजीचे पक्षास अधिक जोर आला, व हा कज्जा सन १८३३ त अतिशय वाढून शेवटीं कंपू पैकीं पहिली पलटण बरवाहदर इचा हेमसिंग कप्तान व हुकुम सिंग नायक यांणीं जनकोजीचा पक्ष उचलला, आणि जुलई महिन्याचे १० वे तारखेस सरकारवाड्यास वेढा घालून त्यांतील कांहीं लोकांनीं जनकोजी शिंद्यास वाड्यांतून फुलबाग ह्मणून शहरा बाहेर पूर्वेचे आंगास एक रमणीय बाग असे तेथें नेलें, आणि ते बायजाबाईचे पक्षाचे वाड्यांतील व बाहेरच्या लोकांस महान भय दाखवूं लागले. तेव्हां बाई निरुपाय होऊन गुप्तपणें पायानींच आपली नणंद बाळाबाई इजकडे प्रथम गेली, आणि तेथून आपला बंधु हिंदूराव बाबा याजकडे जाऊन तेथें रेसिडेंटास भेटण्याकरितां बोलाविलें. त्यासमयीं तो आपण भांडणाऱ्यां पैकीं कोणाचाच पक्ष धरीत नाहीं असें दर्शवीत असे, या कारणानें त्याणें भेटीस येण्याचें नाकारलें. नंतर जांसशिकंदर या नांवाचा शिंद्याचा एक सरदार—ज्याणें बायजाबाईचा पक्ष सोडिला नवता, त्याचे हाताखालची एक पलटण बरोबर घेऊन मिस्तर काव्हेडिश याचे घराकडे जाण्याकरितां बायजाबाई निघाली. तों रस्त्यांत गोपाळराव शिंदा याणें जनकोजी शिंद्याचे पक्षाची मोठी फौज आणून तिजला आडविलें. त्यासमयीं लढाई होऊन उभय पक्षीं बहुत नाश झाला असता, परंतु इतक्यांच संधीस रेसिडेंट याणें सांगून पाठविलें कीं, मी जनकोजी शिंद्याची भेट घेऊन येई पर्यंत लढूंनये. नंतर रेसिडेंट महाराजांचे भेटीस जाऊन त्यांचे बोलण्यांत ठरलें कीं, बायजाबाई जर पुढें कांहीं बेदा न करितां कंपनी सरकारचे इलाख्यांत जाऊन राहिली, तर तिचा सन्मान राहण्या माफक शिंद्यानें तिजला खर्चास पुरवावें. असें ठरल्यावर रेसिडेंटानें ती गोष्ट बाईकडून कबूल करविली. तेव्हां बायजाबाईस विरुद्ध पक्षाचे फोजेनें जाऊं दिलें. यापुढें ती निघून कसोली ह्मणून सुमारें तीन कोशांवर एक गांव आहे तेथें आली, आणि तेथून धोलपुरास गेली.

तेथूनही तिणं आपणास राज्याची पुन्हा मुखत्यारी मिळण्याविषयीं प्रयत्न चालविला होता, परंतु कांहीं झालें नाहीं.

७ बायजाबाईचा अधिकार हिरावून घेतल्याचें गवरनर जनरल यांणीं ऐकून त्यांणीं जनकोजी शिंद्यास एक पत्र लिहिलें कीं, तुह्मी ग्वाल्हेरचा अधिकार घेतला आहे, त्यास बायजाबाईची जी कांहीं खासगत मिळकत असेल ती व तिच्या पक्षाचे लोक यांस ग्वाल्हेरीहून सुरक्षित जाऊंद्यावें. तें लिहिणें जनकोजी शिंद्यानें मान्य केलें. नंतर बाईचा भाऊ हिंदुराव व तिची धाकटी कन्या चिमाबाई जी गरोदर होती ती व तिचा भ्रतार व आणखी तत्पक्षी लोक हे सर्व त्यांच्या खासगत जिंदगीसह जाऊन बायजाबाईस मिळाले. पुढें हें सर्व खटलें आग्र्यास जाऊन राहिलें. यानंतर चिमाबाईस लेंकरूं झालें त्यासह ती मारली. तेव्हां बायजाबाईची पुन्हा अधिकार मिळण्याची आशा अगदीं नाहींशी झाली.

८ आग्रा हें शहर ग्वाल्हेरी नजीक आहे सबब बायजाबाई तेथें नेहेमी राहिली असतां कांहीं राज्य उलाढालीची मसलत करील, यास्तव इंग्रजांनीं तिला यमुनापार लांब कोठें जाऊन राहाण्या विषयीं सांगितलें. त्यावरून ती तेथून निघाली ती आपल्या सर्व हत्यारबंद लोकां सह फरकाबादेस गेली; आणि आपल्या ग्वाल्हेरच्या द्रव्या विषयीं तंटा पडला आहे त्याची इंग्रजांनीं मध्यस्थी केल्या शिवाय पुढें जाणार नाहीं असें म्हणून आपली छावणी तेथेंच घालून राहिली. तेव्हां बायजा बाई दक्षिणेंत जाहागिरीचे गांवीं कांहीं दंगा न करितां जाऊन स्वस्थ पणें राहण्यास कबूल झाल्यास तिचा सन्मान रक्षण्यास सालीना द्रव्याची मोठी रकम पोंचती होण्या विषयीं जिमेदार होण्याचें इंग्रजांनीं कबूल केलें. पुढें या गोष्टीस बायजाबाईही निरुपाय होऊन कबूल झाली आणि दक्षिणेंत गेली.

९ या स्त्रीची बुद्धि विशाळ व वर्तणूक सभ्य असून हिजमध्यें राज्य करण्याचीही शक्ति कमी नवती, परंतु आपल्या सोयऱ्यां धायऱ्यांचा अयोग्य पक्ष धरीत असे, आणि सरकारी पैसा कारखान्यांत खर्चीं घालून त्यांतून शिलक उरवून ती खासगत संपत्तींत संचय करण्याची हिला बहुतच आवड असे. हिचा स्वभाव जरा जुलमी असे तत्रापि दुष्ट नसे. आणि हिच्या कारकीर्दींत ग्वाल्हेरचा बंदो-

बस्त इतर हिंदुस्थानी राज्यां प्रमाणेंच चांगला होता. हिला पदभ्रष्ट केल्यावर जनकोजी शिंद्यास कांहीं वर्षे पश्चात्ताप झाला असावा, कारण तिच्या मागें फौजेंतील लोक त्याचा हुकूम न मानून, त्यांजला वेतन बरोबर मिळत नसे यामुळें ते वारंवार बैदा करून राजासही भय दाखवून स्वराज्यांत व परराज्यांत शांति राहूं देणार नाहींत असें दिसलें.

१० बायजा बाई दक्षिणेंत निघून गेल्यावर मागें जनकोजी शिंद्यानें माजी कामदार मुख्य होते त्यांस दूर करून कृष्णराव मामा, संभाजी आंग्रे, रामराव फाळके, दादा खासगी वाले, मुलाजी दुकानदार, व उदाजी खडके यांजकडे राज्याचीं मोठमोठीं कामें संपविलीं. पुढें आगष्ट महिन्याचे २० वे तारखेस महादजी शिंद्याची कन्या बाळा बाई तीही वारली. नंतर सन १८३५ त जनकोजी शिंद्याची दुसरी स्त्री ताराबाई बाळंतीण होऊन प्रसवलेल्या कन्येसह वारली. तेव्हां शिंद्यानें तिचीच आणखी एक धाकटी बहीण होती तिलाच वरून या तिसऱ्या बायकोचें नांव ताराबाईच ठेविलें.

११ या नंतर कारभारी लोकांत आपसांत पटेनासें झालें, व जनकोजी शिंदा राज्य कारभारांत मन घालीना, यामुळें कृष्णराव मामा मुखत्यार असे. त्याचें कांहीं चालेना, व इतर कारभारी मंडळींही राज्याचे कामांत परस्परांकडील कामें वैमनस्या मुळें कमीनाशी झाली. आणि ज्या कारभाऱ्याचा पक्ष फौजेंतील लोक उचलीत तोच वर्चस्व पावे असें होत चाललें. शेवटीं कृष्णराव मामावर कांहीं वाईट कामाचा आरोप येऊन त्याजला शिंद्याचे लश्करांतून घालविलें. त्या समयीं दादाखासगीवाला मुख्यत्व पावला, परंतु त्यासमयीं ग्वाल्हेरीस जो इंग्रजांकडील रेसिडेंट होता, त्याची बदली होण्येवेळीं त्याणें कृष्णराव मामास बोलावून त्याला पुन्हा कारभारी मंडळींत स्थापिलें.

१२ पुढें सन १८४२ च्या आरंभीं जनकोजी शिंद्याची प्रकृति बिघडली आणि सरकारी कामदारांचा रामराम ही होणें कठीण पडूं लागलें. त्यासमयीं त्याजपाशीं लिंबाजी नांवाचा एक बहुत कपटी हुजऱ्या होता, म्हणून सर्व लोक त्याची खुशामत करीत असत. तो जनकोजी शिंदा अजारी पडल्यावर बहुत करून दुसऱ्या कोणासही त्याजपाशीं जाऊं देत नसे. आणि कारभारी वगैरे

कोणी कांहीं विचारण्यास गेला असतां, महाराजांचा हुकूम अमुक झाला आहे, असें लोकांस आपल्या मुखत्यारीनें सांगे. सारांश सर्व राज्याचें काम त्याचे विचारें होऊं लागलें. नंतर आगष्ट महिन्यांत जनकोजीची प्रकृति अगदीं बिघडली, आणि सन १८४३ च्या जानुआरी महिन्याचे ७ वे तारखेस तो वंश नसून मृत्यु पावला.

१३ या राजानें आपला बहुतेक काळ ऐष आरामांतच घालविला. याच्या सुमारें नऊ वर्षांचे कारकीर्दींत जरी विशेष रक्तपात झाला नाहीं, तरी राज्यांत स्वस्थता असल्यानें जें सुख प्रजेस प्राप्त होतें त्याचा अगदीं लोप होता. आणि त्याची राजधानी लश्कर नामें नवीन शहर होतें, त्यांत नेहेमी बंडाळे करणारी बहुत फौज राहिल्या मुळें तेथील लोकांस नेहेमी प्राण संकट असे. कोणी फौजेच्या अधिकाऱ्यानें एकाचा पक्ष धरिला म्हणजे दुसरा गृहस्थ दुसऱ्या फौजेच्या अधिकाऱ्यास आपलासा करी. नंतर या दोन फौजेंत तंटे होत. ते सोडविण्यास महत्प्रयास पडे; आणि असें होतां होतां, दवलतराव शिंद्यानें या फौजेकडून राज्यास मोठा धोका होईल असा जो पूर्वींच विचार केला होता; तो जनकोजी शिंद्याचे मरणा नंतर लागलाच अनुभवास आला. हा विषय पुढील भागांत येईल.

## भाग १०.

जनकोजी शिंदा निवर्तला, तेव्हां त्याची तिसरी स्त्री ताराबाई, यशवंतराव घोरपडे यांची कन्या, अवघी बारा वर्षांचे वयाची होती. ही ताराबाई, जनकोजी शिंद्याचें दुसरें लग्न ज्या कन्येशीं होऊन सन १८३५ त बाळंतीण झाली, आणि प्रसवलेल्या कन्येसह वारली, तिची धाकटी बहीणहोय. जनकोजी वारल्यावर बाईनें सर्व सरदारांनुमतें व इंग्रजांकडील रेसिडेंट कर्नल स्पियर याचे संमतानें भगीरथ नांवाचा सुमारें आठ वर्षांचा मुलगा सन १८४३ माघवद्य ८ बुधवार रोजीं दत्तक घेऊन त्याजला जयाजीरावशिंदे अलिजाह असें नामाभिधान दिलें. शिंद्याच्याकुळांत प्रथम चांगोजीनामें मूळ पुरुष होता, त्याचापुत्र रोडोजी, त्याचा पुत्र आपाजी, त्याचा पुत्र केदारजी, त्याचा पुत्र हणमंतराव, त्याचा पुत्र भगीरथराव, तो हल्लीं गादीवर बसलेला मुलगा होय. दत्तविधान झाल्यावर सर्वांनीं मिळून कृष्णराव मामास राज्याचा मुखत्यार कारभारी नेमलें. हा गृहस्थ जनकोजी शिंद्याच्या पहिल्याघरचा मामा. हें वर्तमान त्या वेळेचा गवरनरजनरल लार्ड एलेंबरो यांणीं ऐकिल्यावर त्यांणीही मामाची मुकत्यारी मान्य केली.

२ यापूर्वीं जनकोजी महाराज यांणीं कांहीं कारणा वरून ईश्वरीसिंग नांवाचे एका पलटणी सरदारास चाकरीवरून दूर केलें होतें, आणि त्याची पलटण माळव्यांत चाकरीवर पाठविली होती. परंतु तो सरदार राजाच्या हुकूम न मानितां बळेंच त्या पलटणीस जाऊन मिळाला, आणि त्यांतील शिपायांनीं ही त्याचा पक्ष स्विकारला. यामुळें त्या पलटणीस बोलावून त्यांतील मुख्यांस शिक्षा द्यावी व बाकीच्यांस फांटा द्यावा असा हुकूम झाला असतां, तो सरदार त्या पलटणचे बळावर तेथेंच राहून जनकोजी वारल्यावर पलटणीसह ग्वाल्हेरीस आला. त्याजला शिक्षा करण्याविषयीं व आणखी फौजेचें वेतन देणें बहुत बाकी राहिलें होतें सबब ती नेहिमीं हुकूम अदोलीकरी व बेदाही करी. यास्तव त्याचें वेतन देऊन फौजखर्च कमी करावा असें गवरन-

रजनरलचें मत पडलें. त्यावरून मामा मुखत्यार याणें तसें करण्याचें योजिलें, परंतु मध्यंतरीं मुखत्यार व त्याच्या हाताखालचे कामदार संभाजीआंग्रे, दादा खासगीवाले, मुलाजी व उदाजीखटके यांचें आपसांत पटेनासें झालें. याचें कारण असें दिसतें कीं, मामास पूर्वी एकवेळ लश्करांतून घालविलें होतें. त्यासमयीं खासगीवाला पुढें सरसावला होता, आणि आतां मामा मुखत्यार झाल्यामुळें आपलें कांहीं चालणार नांहीं असें दादास वाटलें. आणि खासगीवाल्याचें वजन वाड्यांतील लोकांत जाजती असल्या मुळें त्याणें नारिंगी या नांवाच्या कुळंबिणीचे सहायानें ताराबाईस आपल्या पक्षाची करून घेतली, आणि तिचे वशिल्यानें मामाचा कोणत्याही कारभारांत चालेनासें केलें.

३. इकडे मामाची मुखत्यारी गवरनरजनरल यांणीं मान्य केलीहोती, सबब त्याजला याचा पक्षपातकरून अधिकार रक्षण्यास मदत लागेल ती देण्यास कबूल करावेंलागलें. त्याप्रमाणें त्यानें कांहीं फौजही ग्वाल्हेरचे इलाख्यांत पाठविण्याची मसलत ठरविली. परंतु मामाचें ह्मणणें पडलें कीं, हीफौज आल्यानें ग्वाल्हेरच्या राज्यांत एकदंम गवगवा होऊन आपली येथील लोकांत अपकीर्ति होईल. यास्तव दादा व नारिंगी यांस युक्तीच्या वाटेनें काढून दिलीं ह्मणजे बाईस आपले पक्षाची करून घेऊन कारभार चालविण्यास अडचण पडणार नाहीं. ही युक्ति त्याणें अशी योजिली कीं, मृत ताराबाई व जनकोजी यांच्या अस्ति काशीस पाठवावयाच्या होत्या त्या नारिंगी कुळंबीण व दादाखासगीवाला यांजबरोबर रवाना कराव्या, आणि दवलतराव शिंद्याच्या अस्तिही दादानेंच काशीस पोंहचविल्या होत्या, यामुळें मामाचे मनांत या युक्तीची अधिकच दृढता आली. परंतु नारिंगी व दादा या दोघांचें वजन ताराराणीपाशीं विशेष असल्यावरून त्या दोघांसही काशीस न पाठविण्या विषयीं तिणें आग्रह धरिला. आणि तिणें आपले बंधूजवळ हातांतील आंगठीची खूण देऊन मामाकडे त्या उभयतांस काशीस न पाठविण्या विषयीं निक्षून निरोप पाठविला. यास्तव मामा तिचा आग्रह मोडूं शकला नाहीं.

४ याच समयास गवरनर जनरल सिंध देशाचा बंदोबस्त करून कलकत्यास जात असतां ग्वाल्हेरचे मुखत्यार व सरदार यांणीं त्यांची आग्रा मुक्कामीं भेट

घ्यावी असा नेम ठरला होता. परंतु राणीजवळ नारिंगीचें प्राबल्य विशेष वाढूं लागल्यामुळें रेसिडेंट व मुखत्यार यांस ग्वाल्हेर सोडून जातां येईना. तेव्हां त्यांणीं रेसिडेंटाचा असिस्टंट व आणखी कोणी दुसरे सरदार यांस पाठविलें. त्या वरून गव्हरनरजनरल यांचें रेसिडेंटास लिहिणें आलें कीं, ग्वाल्हेरची फौज, कारभारी, आणि राणी, यांच्या स्थितिविषयीं आपणास पूर्वीं पक्की माहिती झाली असती तर मामास मुखत्यार होण्याची मान्यता आपण दिली नसती. हें लिहून आल्यावर असें दिसतें कीं, दादा खासगीवाल्यास सहाय करून घेऊन त्याचे मदतीनें नारिंगीस घालविण्याची मसलत रेसिडेंटानें मामास सांगितली. आणि त्याप्रमाणें त्याणें दादास सारखाचा करून त्याचे विचारानें राणीचा बाप यशवंतराव घोरपडा याजकडून तिला सुचविलें कीं, नारिंगीस घालवून द्यावी. या मसलतीस बळकटी येण्या करितां तारीख १८ मार्च सन १८४३ रोजीं रेसिडेंटानें मोठें दरबार भरून सर्व सरदारांचे समक्ष सांगितलें कीं, सर्वानुमतें मामास मुखत्यार नेमिलें. आतां त्याच्या आज्ञा मान्य केल्याशिवाय राज्याचें काम बरोबर होणार नाहीं. या बोलण्यांतच नारिंगीस काढण्या विषयीं सूचना केली. त्याप्रमाणें ती त्याच महिन्याचे २१ वे तारखेस उज्जनीस जाण्या करितां निघाली.

५. हें कृत्य झालें तोंच गवरनरजनरल यास भेटण्या करितां आग्र्यास गेलेली सरदार मंडळी परत आली. तेव्हां मामानें फौजेचें चढलेलें वेतन चुकवून फौज कमी करण्याचा कारभार सुरू केला. इतक्यांत तारा राणीनें मामास सांगून पाठविलें कीं, गंगाजळी ह्मणून जो शिंद्याचा मुख्य खजिना आहे, त्यांतून वेतन चुकविण्यास पैसा घेऊंनये. हें कृत्य खासगीवाल्याचे शिकवणी वरून झालें असावें असें मामास वाटलें. त्या वरून तो, राणीचा बाप व रामराव फाळका यांस बरोबर घेऊन या मनाईचें कारण विचारण्यास राणीकडे गेला. तेव्हां ती बोलिली कीं, मी मनाईचा निरोप पाठविला हीच चूक केली.

६ असें वर्तमान चाललें असतां एक नवीनच प्रकरण उद्भवलें. तें असें कीं, कृष्णराव मामा याणें आपल्या अधिकारास जास्त दृढता यावी ह्मणून जयाजीराव

महाराजाचें आपल्या पुतणीशीं लग्न उभारलें. परंतु येणें करून पुढें अपाय बहुत झाले, तो प्रकार:— मामा मुखत्यार असल्यामुळें त्याचे भिडेस्तव राणी व सर्व सरदार यांणीं जरी त्या लग्नास होकार दिला, तरी विरुद्ध पक्षाचे लोकांनीं तिला भासविलें कीं, राणीचें वर्चस्व आपणांवर चालूंनये ह्मणून मामा महाराजांचें लग्न आपले पुतणीशीं करितो. असें करण्यास मामानें रेसिडेंटाची परवानगी घेतली. व रामराव फाळकाही त्या गोष्टीस अनुकूल झाला. हें बाईस न आवडून तिणें तारीख २१ वी मे सन १८४३ रोजीं रामरावाचे घरावर जप्ती पाठविली. नंतर कांहीं दिवसांनीं ती जप्ती उठवून उदाजी खटका याजबरोबर तिणें रेसिडेंटास सांगून पाठविलें कीं, मामा मुखत्यार नसावा. त्या वरून पहिला बेत राहून कोणी गुजर या आडनावाच्या मराठ्याचे कन्येशीं महाराजांचें लग्न झालें.

७ या नंतर तारीख २६ रोजीं तिणें पुनः मामाचे घरावर जप्ती पाठवून रेसिडेंटास कळविलें कीं, तुह्मी मामास मुखत्यारीतून काढून त्याच्या जाग्यावर भाऊ पोतनीस व रामराव फाळका यांस नेमावें. परंतु रेसिडेंटानें तें मान्य केलें नाहीं. या वरून असें वाटतें कीं, याच कारणास्तव मामाचे घरावरची पहिली जप्ती उठली. इकडे गवरनरजनरल यांचें मत पडलें कीं, दरबार व इंग्रज सरकार या उभयतांचे मान्यतेनें मामा एकवेळ मुखत्यार झाला, तो विन अपराधी काढला जाऊंनये. इतकें झालें असून तारीख ३ री जून या दिवशीं मामास निघून जाण्याविषयीं राणीनें सांगितलें. त्यावरून तारीख ५ रोजीं तो दक्षिणेंत जाता झाला.

८ मामास घालविल्यावर गवरनर जनरल यांनीं रेसिडेंटास सांगितलें कीं, तुम्हीं तूर्त हवा बदलण्याचे निमित्तानें धोलपुरास येऊन रहावें. ही बातमी ताराराणीस कळल्यावर आपण मामास दूर केल्यामुळें गवरनर जनरल यांस राग आला असावा, असें तिला वाटून त्याला दूर करण्याचीं वास्तविक कारणें इंग्रज सरकारास कळविण्याकरितां रेसिडेंटाकडे एक याद वरिष्ठांकडे पाठविण्यास दिली. तींत कारणें दाखविलीं होतीं तीं येणेंप्रमाणें:— त्याणें लोकांपासून लांच घेतला, युरोपियन लोकांशीं परभारा पत्रव्यवहार ठेविला, नारिंगी ही मयत महाराजांची बहुत आवडती दासी असून तिला काढून दाकिली, दादा खासगीवाला हा शिं-

याचे घराण्यांतील वंश परंपरेचा चाकर असतां त्याला काशींत पाठवावयाची मसलत ठरविली, फौजेंत आपल्या तर्फेचे लोक ठेविले, व राणीचा अधिकार नाहींसा करण्याचे हेतूनें, तिणें घेतलेल्या मुलाशीं आपल्या पुतणीचें लग्न करण्याचें योजिलें. या यादी बरोबरच तिणें सर्व सरदार लोकांकडून त्याच मजकुराचें घेतलेलें आणखी एक पत्र होतें तेंही पाठविलें. परंतु हें पत्र व याद गवरनर जनरल यांस पोंहचण्या पूर्वींच रेसिडेंटास धोलपुरास जाण्याविषयीं हुकूम आला होता, त्यावरून तो तारीख १८ जून रोजीं ग्वाल्हेराहून निघून जाऊन धोलपुरास राहिला. त्यानंतर ग्वाल्हेरीस स्वस्थता आहे, असें ऐकिल्यावर त्याला परत जाण्याविषयीं हुकूम झाला होता; परंतु पुनः तेथें कांहीं गडबड दिसल्यामुळें तो गेला नाहीं.

९ नंतर खासगीवाला याणें फौजेचें वेतन दिल्यावर ज्या लोकांनीं ती फौज आपल्याकडची करण्याविषयीं मदत केली होती, त्यांजला इनामेंही दिलीं. याशिवाय यशवंतराव भाऊ, ज्याणें मागें इंग्रजांशीं लढाई केली होती, त्याला फौजेचा अधिकार देण्याकरितां त्याणें बोलाविलें. तसाच आत्माराम पंत यास वकिलाचे कामावर नेमिलें. मामा ग्वाल्हेराहून निघून गेल्यावर तो शिरोंज एथें पावसाळा घालविण्याकरितां राहिला होता. तो तेथें राहिल्यानें परत येण्याचा कांहीं प्रयत्न करील; सबब त्याणें तेथें राहूनये असें दादानें व राणीनें रेसिडेंटाकडे सांगून पाठविलें.

१० अशी गडबड शिंद्याचे दरबारांत चालली असतां फिसादी लोकांस आपलें काम चालविण्यास अवकाश सांपडला. जयपुराकडील कांहीं चोरटे लोक, तसेंच चंदेरीचे प्रांतांतील लुटारू हे गुण्याचे आसपास येऊन लूट करूं लागले. त्यांचा बंदोबस्त करण्यास शिंद्याचे कारभारी असमर्थ झाले.

११ वरील गोष्टीच्या संदर्भावरून अनुमान होतें कीं, खासगी वाल्याच्या मनांत मामास काढण्याचें इतकेंच असतें तर तसें झाल्यावर फौज कमी करणें व देशांत स्वस्थता राखणें वगैरे इंग्रज सरकारचे हेतु पूर्ण करण्याकडे आपलें लक्ष पुरविलें असतें. तेणेंकरून खासगीवाल्यास मुखत्यारीचा अधिकारही मिळाला असता. कारण दरबारांतील मामाचे विरुद्ध मंडळीशीं रेसिडेंट स्पियरसाहेब

याचें वांकडें आहे, असें लार्ड एलंबरो याचे मनांत आलें असावें. कारण त्याणें अशा निकराचे संधीस, ज्या समयीं ग्वाल्हेर एथील माहितगार मनुष्य अवश्य पाहिजे, त्या ऐनवेळीं दरबारचा मान हलका करण्याकरितां ग्वाल्हेरची रेसिडं-टी मोडून ती बुंदेलखंडचे रेसिडंटींत मिळवून तेथें एक त्याचा असिस्टंट लेफ-टिनंट सर रिचमंड शेक्सपीयर यास नेमणार अशा निमित्तानें पहिला रेसिडेंट करनल स्पीयर याची नागपुरास बदली केली. परंतु खासगी वाल्यानें उभय सरकारच्या तफावतीस समेट न घालितां इंग्रजांचा शत्रु यशवंतराव भाऊ यास फौजेचा मुख्य अधिकार देण्यास व आत्मारामपंत जो रेसिडेंटाचे वकीलीवरून घालविला होता, त्याजला तो पहिला अधिकार देण्याकरितां बोलावून रामराव फाळका जो त्यावेळीं इंग्रजांशीं समेट पाडण्याचें द्वार, त्याचेंही मन दुखविलें. ह्या व आणखी कित्येक कारणांवरून दादा खासगीवाला इंग्रजांचा उघड शत्रु दिसं लागला. मामाची मुखत्यारी चालूं न देण्यास हाच मूळकारण होता, असें गवरनर जनरलचे नजरेस उघडपणीं आलें. तो आपल्या हस्तगत झाल्या-शिवाय ग्वाल्हेरच्या राज्याचा नीट बंदोबस्त होऊन उभय सरकारचे सरहद्दीवर शांतता राहाणें नाहीं; असा त्याचा दृढ निश्चय होऊन त्याणें खासगीवाल्यास मामा प्रमाणें घालवावें असें प्रथम सांगून तें न झालें तेव्हां त्याला आमचे हवालीं करावें असें रेसिडेंटाचे मार्फत मागून बोलणें लाविलें. परंतु तारांराणी तें मान्य न करितां त्याचे अपराध असतील ते इंग्रजांनीं माफ करावे असें ह्मणूं लागली. तद नंतर ती त्यास आपणच आपल्या राज्यांतील एका किल्यांत कैद करण्यास कबूल झाली. परंतु इंग्रज लोकांनीं तेंही मान्य केलें नाहीं. शेवटीं उभय सरका-रांत तशीच तफावत राहून गवरनर जनरल यांणीं आग्रा एथें फौजेची तयारि करण्याकरितां कमांडर इनूचीफ यांस आज्ञा केली.

१२ त्याच समयास दरबारांतून व मुखत्यांकडून खासगीवाल्याकडून काय काय आगळिकी झाल्या व त्यांचें निवारण कसें झालें पाहिजे, या सविस्तर मजकुराचें पत्र (खलीता किंवा थैली असें ज्यास ह्मणतात) रेसिडेंटाकडून राणीचे नांवें आलें. त्यांत खासगीवाला हवालीं झाल्याशिवाय दुसरा प्रकार कांहींच होणें नाहीं, असें लिहिलें होतें. ह्मणून तें खासगीवाल्यानें छपवून ठेवून राणीचे

कांनीं तो मजकूर जाऊंच दिला नाहीं. व रामराव फाळका इंग्रजांशीं मिळून इकडील सर्व मजकूर त्यांस कळवितो, ह्मणून खासगीवाल्यानें त्यास धरून कैद करण्याचा बेत केला. परंतु तो तडीस जाण्यापूर्वींच त्याविषयीं रामरावास कळलें, तेव्हां त्याणें लागलेंच महाराज कंपूंत जाऊन तेथें बापूशितोळे याचे मध्यस्थीनें ती फौज आपल्या तर्फेची करून तिच्या बळानें उलट खासगीवाल्यासच वाड्यांतून पकडून कंपूंत नेलें. व तेथें त्यास कैद प्राप्त झाल्यावर यशवंतराव घोरपडा हा मुख्य झाला.

१३ पूर्वीं आपण राणीचे नांवचें पाठविलेलें पत्र खासगीवाल्यानें लपवून ठेविल्याचें रेसिडंटानें ऐकून दरबाराशीं आपला पत्रव्यवहार पुनः चालणार नाहीं, ह्मणून आपला मीर मुनशी मिरजाफर अली याज बरोबर त्याच प्रमाणें दुसरें पत्र देऊन तें राणी व सर्व सरदार यांच्या समक्ष वाचण्याकरितां धोलपुराहून रवाना केलें. पाठीमागून खासगीवाल्यास विरुद्ध पक्षाचे लोकांनीं प्रतिबंधांत ठेविलें, असें ऐकिल्यावर त्याला धोलपूर मुक्कामीं पाठवावें, असाही त्या मीर मुनशी बरोबर रेसिडंटनें रामराव वगैरे लोकांस निरोप पाठविला. परंतु कंपूचे बाहेर त्याजला नेण्याचें आमचें सामर्थ्य नाहीं, कारण विरुद्ध पक्षाची फौज लढाई करील असा त्यांणीं जाब दिला. नंतर महाराजकंपू व जिनसी या दोहों फौजांमध्यें खासगीवाल्यास सोडविण्याकरितां आपसांत लढाई चालू झाली. तींत उभय पक्षीं तोफांचा मार चालला होता. लढाईमध्यें सुमारें शंभर लोक मेल्यावर बाईनें ती बंद करविली. ही लढाई बंद झाल्यावर मीर मुनशी यांनी सर्व सरदार व मानकरी लोकांसह वाड्यांत दरबार भरून रेसिडंटाकडून आणलेलें पत्र वाचलें. त्यावेळीं खासगीवाल्याकडील इतर मंडळी व अलेक्झांडर साहेबाची बायको यांचे शिकवणीवरून ताराराणी ह्मणूं लागली कीं, खासगीवाल्यास तुह्मीं सांगण्याच्या पूर्वींच कैद करून ठेविलेलें आहे. त्यासमयीं दरबारचे कांहीं लोक, खासगीवाल्यास स्वाधीन करण्याविषयीं सांगत होते, परंतु फौजेंतील कांहीं लोक व बाई तें ऐकेनात. तेव्हां तो मीर मुनशी तेथून निघून धोलपुरास परत गेला. त्यानंतर तारीख १५ वी नोव्हेंबर रोजीं रेसिडेंट आग्रा एथें निघून गेला.

१४. त्यानंतर रेसिडंटाचे समजुती करितां दरबारांतून उदाजी खटका

यास पाठविलें. परंतु रेसिडेंटानें त्याची भेट घेतली नाहीं. त्यावरून ताराबाईनें रामरावफाळका व बापूशितोळा यांस बोलावून सांगितलें कीं, तुम्ही रेसिडेंटा कडे मध्यस्थीस जावें. व खासगीवाल्यास मागाहून पाठवून देत्यें. त्यावरून ते दोघेही निघून आग्र्यास गेले, व दादा खासगी वाला यास महाराज कंपूंतून जेकब साहेबाचे छावणींत नेलें. परंतु तेथें कांहीं फिसाद होऊन तो पुनः राजवाड्यांत येऊन आपल्यावरचें अरिष्ट टळावें ह्मणून कांहीं प्रयत्न करीत होता. त्याणें यशवंतराव घोरपड्यासही आपल्या पक्षाचा करून घेतलें. इतकेंही केलें असतां कांहीं इलाज न चालून, आग्र्याहून इंग्रजी फौज ग्वाल्हेरीस रवाना होणार अशी बातमी ताराराणीनें ऐकून त्यास आग्रा एथें रवाना केलें.

१५. इकडे असें वर्तमान चाललें असतां ग्वाल्हेरचे रेसिडेंट कर्नल स्पियर यांणीं आपलें काम शेक्सपीयर साहेबाचे हवालीं केलें. व ते तेथून निघून नागपुराकडे चालते झाले. पुढें होणाऱ्या लढाईंत हजीर ऱ्हाण्या करितां गवरनर जनरल कलकत्याहून निघून सन १८४३ च्या दिसेंबरचे ११ व्या तारखेस आग्र्यास येऊन पोंहचले. तेथें फौजेची तयारी होतीच. तिजला त्यांणीं पुढें जाण्यास हुकूम दिला. आणि रामराव फाळके व बापूशितोळे यांची भेट घेऊन ते सर्व पुढें मनीयास आले. इतक्यांत ग्वाल्हेरीहून गंगाधर बल्लाळ ऊर्फ दादा खासगीवाला यास त्यांचे हवालीं करण्या करितां पाठविलें होतें, तोही तेथें जाऊन पोंहचला. त्याला गवरनर जनरल यांणें स्वाधीन करून घेऊन त्याचे ठेवण्याचे तजविजी करितां आग्र्यास पाठवून दिलें. नंतर त्यास काशी जवळ चांडाळगडीं ठेविलें.

१६. उभय सरकारांमध्यें मुख्य तफावती पडण्याचें कारण दादा खासगीवाला तो हवालीं झाला. आतां तह करण्यास हरकत पडणार नाहीं, असें समजून गवरनर जनरल यांणें, बुंदेलखंडचा रेसिडेंट कर्नल स्लीमान हा दक्षिणे कडून ग्वाल्हेरीवर चढाई करणाऱ्या फौजे बरोबर झांशीस आला होता, त्याला ग्वाल्हेरीस जाऊन आपला व दरबारचा तह होणें आहे, त्यास त्याविषयीं तुह्मी मसूदा तयार करावा, आणि आपल्यास येऊन मिळावें असें लिहून पाठविलें. त्याप्रमाणें तो साहेब त्याच महिन्याचे ११ तारखेस ग्वाल्हेरीस आला. आणि त्याणें ही तह

नाम्याचीं कलमें सुचविलीं, तीं बाईनें मान्य केलीं. व ती आपल्या मुलास बरोबर घेऊन गवरनर जनरलचे भेटीस जाण्यास कबूल झाली. परंतु सर्व सरदार व ती म्हणूं लागली कीं, मागील वहिवाटी प्रमाणें गवरनर जनरलची व आपली भेट चंबला नदीचे उत्तर किनाऱ्यावर व्हावी, व आपण तेथें पोंहचूं पर्यंत इंग्रजी फौज ग्वाल्हेरचे इलाख्यांत येऊं नये. कारण तसें झालें असतां ग्वाल्हेरची विथरलेली फौज उगाच बैदा करील. या म्हणण्याविषयीं स्लीमान साहेबानें गवरनर जनरल यास लिहिलें. तेव्हां इंग्रज लोक म्हणूं लागले कीं, ग्वाल्हेरीस फौज तयार करण्यास अवकाश मिळण्या करितां हें सर्व बोलणें आहे. नंतर स्लीमान साहेब गवरनर जनरल यांस जाऊन मिळाला.

१७ गवरनर जनरल व दरबारचा वकील रामराव फाळका व संभाजी आंग्र्या यांची त्याच महिन्याचे २० वे तारखेस धोलपुरास भेट झाली. तींतही यांणीं इंग्रजी फौज, तारा राणी येण्या पूर्वीं चंबलानदी पार जाऊंनये असा आग्रह धरिला होता, परंतु गवरनर जनरल तें न ऐकतां सर्व फौज घेऊन चंबला नदी उतरला, आणि २३ व्या तारखेस हिंगोणा म्हणून कुवारी नदीच्या कांठीं एक गांव आहे, तेथें ती सर्व फौज विश्रांती घेण्याकरितां पाच दिवस थांबली. तेथें ताराबाई भेटण्यास येते असें वर्तमान आल्यावर वकीलाच्या सांगण्या वरून तारीख २८ रोजीं राणी व महाराज यांस भेटण्याची गवरनर याणें तयारी केली. परंतु ती न आल्यामुळें तो बेत रहित झाला. यापूर्वीं २५ व्या तारखेस बापुशितोळा इंग्रजांची छावणी सोडून ग्वाल्हेरीस गेला व दुसरे दिवशीं संभाजी आंग्र्याही गेला. नंतर ग्वाल्हेरच्या सरदारां पैकीं एकटा रामराव फाळका मात्र इंग्रजांच्या छावणींत राहिला.

१८ तारा राणीचा महाराजास बरोबर घेऊन गवरनरजनरलचे भेटीस जाण्याचा बेत ठरला होता, परंतु दक्षिणेकडून मेजर जनरल ग्रे साहेबाची फौज येऊन शिंद्याचे इलाख्यांत शिरली. तिणें जबरदस्तीनें रसद जमा करतांना कांहीं गांवचीं घरें निरर्थक जाळिलीं. व उत्तरे कडून इंग्रजी फौज ताराराणी मागील वहिवाटी प्रमाणें चंबळा नदीवर पोंहचण्या पूर्वींच शिंद्याचे इलाख्यांत शिरली असे दोहों कारणां मुळें ग्वाल्हेरची विथरलेली फौज समजली कीं, इंग्रज

आपला नाश करण्यास येत आहे, त्यापेक्षां लढून मरावें हें बरें. असा निश्चय करून बाईस पुढें न जाऊं देतां त्यांणीं लढाईची तयारी केली. तींत प्रथम जान बापटिस्ट फिलोज ज्यास त्यांणीं कांहीं काळा पासून फौजेच्या कामांतून दूर केलें होतें, त्यास त्यासमयीं जनरल हें पद देऊन त्याजकडे जिनशीच्या फौजेचा अधिकार दिला, तसेंच घांटीवाल्या फौजेचें, मुख्यत्व राणीचा बाप जो घोरपडा त्यास दिलें, आणि महाराज कंपूतील फौजेचा अधिकार बापुशितोळा याजकडे सांगितला. ही फौज छोद्याकडे इंग्रजांशीं लढण्या करितां निघाली. व एक टोळी कर्नल सिकंदर यास देऊन त्याला दक्षिणेंत पनीहाराशीं ग्रे साहेबावर पाठविलें. छोद्याकडे गेलेल्या फौजेनें छोदा गांव व आसन नदी आपलें पिच्छाडीस घेऊन महाराजपूर नामें दुसरा गांव तो आपल्या डाव्या बाजूस घेतला. व हरएक पलटणा मागें चार चार तोफा व त्यांच्या रक्षणा करितां मागें स्वार अशा बेतानें लढण्यास सिद्ध झाले. इतक्यांत तारीख २९ रोजीं इंग्रजी फौजेचे कमांडर इनचीफ लार्ड गफ यांणीं आपल्या फौजेच्या चार तुकड्या करून त्यांपैकीं दोन शिंद्याचे फौजेवर उजव्या व डाव्या बाजूनें हला करण्यास योजिल्या व दोन तुकड्या समोर लढण्यास टेविल्या. या दोन्हीं फौजा तोफेच्या गोळ्याचे टप्प्यांत येतांच प्रथम शिंद्याचा तोफखाना पुढें सरून अग्नीच्या वर्षावाप्रमाणें तोफांचा मार चालविला. त्यासमयीं शिंद्याच्या तोफखान्यास इंग्रजां कडील तोफखाना बंद करूं शकेना. शेवटीं इंग्रजी पायदळ व स्वार पुढें सरसावून भिडून युद्ध होऊं लागलें. त्यावेळीं शिंद्याचे पायदळानें आपल्या कडील तोफखाना रक्षण्यांत इतकी मर्दुमी केलीकीं, तोफखान्यावरील सर्व माणसें संगिणींनें मारल्या वांचून त्यांणीं तोफा हस्तगत होऊं दिल्या नाहींत. एका गोलंदाजानें तर जखमी होऊन मरतां मरतां शेवटची तोफ डागली, तेणें करून इंग्रजांकडील १७ माणसें एकदम मेलीं. या ठिकाणीं असा पराजय झाल्यावर शिंद्याचे फौजेनें महाराजपूरचा आश्रय करून तेथून निकरानें लढण्यास आरंभ केला; पूर्वींचे लढाईंत इंग्रजी सरदार बहुत पडले होते त्यामुळें आतां लढाई तहकूब होईल असें वाटलें होतें, परंतु त्याच संधीस शिंद्याकडील स्वार लढाई सोडून चालते झाले. यामुळें इंग्रजी फौजेस उत्तेजन येऊन तिणें महाराजपूर एथें ही मोठा हल्ला करून

तें घेतलें. तेव्हां शिंद्याच्या डाव्या व उजव्या बाजूस लढाई चालली होती ती बंद झाली. या लढाईंत इंग्रजांस ५६ तोफा मिळाल्या.

१९ दुसऱ्या वर्तमानावरून कळतें कीं, छोंद्यास गेलेल्या फौजे पैकीं घांटीवालीं पलटणें व विलायती ( मुसलमान ) गोलंदाज ही मात्र फौज लढली, तिणेच इंग्रजाचा इतका नाश केला. बाकीची बहुत्येक फौज रामराव फाळक्याच्या तर्फेच्या लोकांनीं आपल्या कडची करून ठेविली होती, सबब ती लढाईचा आव॰ मात्र घालण्यास आली होती. ती लढाई न करितां निघून गेली.

२० त्याच दिवशीं पनिहार मुक्कामीं मेजर जनरल ग्रे व शिंद्या कडील कर्नल शिकंदर यांच्या फौजेची लढाई होऊन तींतही शिंद्याचा पराजय झाला. व इंग्रजांचे हातीं त्यांच्या २४ तोफा लागल्या. या दोहों लढायां मिळून इंग्रजांकडील सुमारें १०५४ लोक मेले व जखमी झाले. त्यां पैकीं सरदार व साहेब लोक ७० यांपेक्षां जास्त पडले. व शिंद्याकडील मेले व जखमी झाले मिळून १८३६.

२१ लढाई झाल्या नंतर इंग्रजी फौज शिंद्याचें लश्कर लुटून बहुत नाशकरील असें भय पडलें होतें. तें दूर होण्या करितां रामराव व दुसरे सरदार यांणीं तारा राणीस व महाराजांस गवरनरजनरल यांचे भेटीस लौकर बोलाविलें. नंतर लढाई झाल्यावर तिसरे दिवशीं ह्मणजे तारीख ३१ दिसेंबर १८४३ रोजीं ताराराणी आपल्या दत्तक पुत्रास बरोबर घेऊन धनेल्यास आली. आणि दरबार भरलें. महाराजा बरोबर घोरपडाही आला होता, परंतु त्याजवर गवरनरजनरलचा राग होता, ह्मणून त्यास हत्तीवरून खालीं उतरून त्याचे जागीं देवराव जाधव जयाजी रावाच्या पहिल्या घरचा मामा यास रामरावानें त्याच्या भाच्याच्या मागें हत्तीवर खवाशांत बसविलें. दरबार भरलें त्यांत राणीनें आपणा कडील तह ठरविण्यास रामराव व राजा बळवंत शिंग यांस नेमिलें. त्या प्रमाणें त्या मुख्य स्वारांनीं गवरनरजनरलकडे जाऊन ठराव केले. त्यांत मुख्य कलमें ठरलीं तीं येणेंप्रमाणें:— इंग्रजलोक यापुढें जी नवी कांटिजेंट फौज ठेवितील तिचे खर्चाबद्दल त्यांस सरहद्दी वरील शिंद्यानें सोईवार मुलूख लावून द्यावा, शिंद्याकडे पूर्वीची कांहीं बाकी येणें व आणखी हल्लीं जास्त फौज आणिली तिच्या बद्दल खर्चास

मिळून एकवीस लाख रुपये नगदी द्यावे, किंवा याच वर्षांत तितक्या रुपयांची भरपाई होई असा तूर्त मुलूख लावून द्यावा. शिंद्यानें फक्त सहाहजार स्वार व तीन हजार पायदळ व त्या मानानें तोफा ठेवून बाकी फौजेंतून इंग्रज लोक पसंत करतील त्यांस कांटिजेंटी मध्यें भरती करण्या करितां ठेवून बाकीच्यांस मागील वेतन व तीन माही इनाम देऊन फांटा द्यावा. तसेंच ज्या तोफा जास्ती असतील त्या इंग्रजांचे हवालीं कराव्या, व घोरपडा यास तूर्त घालवून देनऊ जयाजी महाराज वयांत येऊन वाकब होत पर्यंत काम चालविण्या करितां सहा असामीची एक मंडळी नेमावी. तींत रामराव फाळके मुख्य असून बाकीचे पांच एक राजा बळवंत शिंग, दुसरे उदाजी खटके, तिसरे देवरावभाऊ मामा, चौथे मुलाजी, व पांचवे भाऊपोतनीस हे असावे. या शिवाय दत्तक घेतलेला मुलगा वयांत आल्यावर ताराबाई करितां तीन लक्षांची जहागीर निराळी काढून ठेवावी.

२२ या प्रकारें तह झाल्यावर गवरनरजनरल व ताराबाई यांणीं ग्वाल्हेरीस येऊन नवीन फौजेचें वेतन देण्या करितां कर्नल स्टांप यास नेमिलें. तेव्हां तो व उदाजी खटका यांणीं किल्यावर जाऊन आपलें ठाणें केलें. नंतर त्या साहेबानें त्या बिघडलेल्या फौजेपैकीं २५५८ लोक मात्र ठेवून बाकीच्यांस त्यांचें वेतन व तिमाही इनाम देऊन कांहीं एक बेदा न करूं देतां ग्वाल्हेरच्या हद्दीपार घालवून दिलें. मागल्या लढाईत घेतलेल्या व हल्लीं फौजेनें स्वाधीन केलेल्या मिळून २०० तोफा इंग्रजांस मिळाल्या.

२३ अशा गोष्टी घडल्या वर तारीख १३ वी जान्युआरी सन १८४४ रोजीं ग्वाल्हेरीस मोठें दरबार भरून तहनाम्यावर परस्परांच्या सया झाल्या. व जयाजीराव शिंद्यास गादीवर बसवून रामराव फाळका मुखत्यारीनें काम पाहूं लागला आणि गवरनरजनरल कानपुराकडे चालते झाले.

# भाग ११.

—000—

शिंद्याची फौज लढाईचे पूर्वी सुमारें तीस हजार होती, तिज पैकीं नऊ हजार ठेवून बाकीच्यांस फांटा दिल्यावर रामराव फाळका मुखत्यारीचा अधिकार चालवूं लागला. त्याणें सर्व कामें आपल्या हाता खालच्या कारभाऱ्यांकडे संपवून त्यांजवर हुकूम मात्र आपला ठेविला होता. त्यांत राजा बळवंतशिंग मुनशी याजकडे परराज्यांतून आलेल्या पत्रांचे जबाबांचें म्हणजे पोलिटिकल एजंटा कडून जीं पत्रें येत त्यांचे जबाबांचें काम; मुल्लाजी कडे दुकानाचें म्हणजे मुलखांतून वसूल येतो तो प्रथम तेथें जमा होऊन नंतर खर्च केला जातो व त्या खजीन्याच्याच संबंधानें कांहीं कापडांचा वगैरे व्यवहार होतो, त्याचें काम; उदाजी खटके यांजकडे बक्षीगिरी म्हणजे फौजेस वेतन वगैरे वांटण्याचें काम; भाऊ पोतनीस याजकडे मकत्यानें मुलूख वगैरे ठरवून देण्याचें काम; अशी वाटणी करून या सर्वांवर रामरावानें आपली मुखत्यारी ठेविली होती.

२ बायजाबाई जेव्हां मागें निरुपाय होऊन दक्षिणेंत राहावयास गेली तेव्हां अधिकार परत नसो, परंतु कांहींतरी मिष करून ग्वाल्हेरीस जावें असा तिचा हेतु होता. परंतु जोंपर्यंत ग्वाल्हेरीस बेदखोर फौज होती तों पर्यंत तिला इंग्रजांनीं येऊं दिलें नसतें. हें ती पक्कें समजत होती, म्हणून रामराव फाळक्यास मुखत्यारी होई पर्यंत स्वस्छ बसली होती. नंतर या राज्यांत स्वस्थता झाल्यावर ग्वाल्हेरची कारभारी मंडळी तिच्या येण्या विषयीं इंग्रजांकडे मध्यस्थी करी अशी कांहीं गोष्ट घडून आली, तो प्रकार असाः— जयाजी महाराजांचें पूर्वीं जरी एक लग्न झालें होतें, तरी बायजा बाईची नात राजाराव्या खानवलकर याजकडे दिली होती, तिची चिमणी राजा नामें एक मुलगी लग्नास झाली होती. तिशीं जयाजी रावानें दुसरें लग्न केलें असतां बायजाबाईनें मोठा हुंडा देण्याचा मान दर्शविला. हें कार्य तडीस जाण्याकरितां व त्या समारंभास त्यांणीं आपल्यास बोलवावें याविषयीं खटपट करण्याकरितां बायजाबाईनें बापूजोशी नामें कोणी एका गृहस्थास पुण्याहून ग्वाल्हेरीस पाठविलें. हें लग्न झालें असतां दवलतराव

शिंद्याच्या सरळ लेकीकडील वंशाशीं राजाचे गादीचा निकट संबंध येतो व आपणास मोठा हुंडा मिळून आपली पुरातन धनीन बायजाबाई इच्या ग्वाल्हेरीस परत येण्याविषयीं लग्न समारंभाचे मिषानें इंग्रज सरकारांत रदबदली करण्यास संधी चांगली मिळल्ये, असें समजून रामराव व दुसरी कारभारी मंडळी हे त्या गोष्टीस अनुमोदन देते झाले. व बायजाबाईस आणण्यास रामरावानें आपला कारकून बाजीराव यास पाठविलें. त्या नंतर ती उज्जनीस येऊन ग्वाल्हेरीस आली, आणि सन १८४८ च्या माघ वद्य ८ रोजीं जयाजी महाराजांशीं खानवलकर यांची कन्या चिमणा राजा इचें लग्न मोठ्या समारंभानें झालें.

३ मागील लढाईचे वेळीं रामराव फाळका याणें इंग्रजांशीं मेळ ठेवून ग्वाल्हेरचें राज्य वांचविलें, यास्तव तो मोठा नामांकित झाला होता व त्या योगें तो लोकांस आवडत असे. इतकेंही असून त्यास त्या राजधानींत शत्रु नवते असें नाहीं. एकेदिवशीं तो रस्त्यांतून जात असतां रात्रीचे वेळीं भरवस्तींत झाडाच्या आडून त्याचे आंगावर कोणी बंदुकीच्या गोळ्या मारल्या परंतु दैवगतीनें त्यास एकही लागली नाहीं.

४ राजाचा द्वितीय विवाह झाल्यावर रामराव बहुत दिवस वांचला नाहीं. तो त्याच वर्षी फाल्गुन माशीं मृत्यु पावला. नंतर बायजाबाईही लौकरच उज्जनीस रहावयास गेली.

५ रामराव वारल्यावर महाराजांस पोक्तबुद्धि येऊन कारभार पहाण्यास सुमारें ४ वर्षांचा अवकाश होता. यास्तव देवराव जाधव महाराजांचा मामा यास मुखत्यार नेमिलें. या गृहस्थाचा स्वभाव रामरावाहून भिन्न असल्या मुळें याचें कारभारी मंडळी व मालकीण ताराराणी, यांशीं पटेनासें झालें. त्यांतून प्रथम याचे अमलांत भाऊ पोतनीस व राजा बळवंत राव यांजवर कांहीं खटलें उपस्थित होऊन त्यांजला शिंद्याचे राज धानींतून घालविलें होतें. तसेच उदाजी खडका व मुलाजी यांजकडे ही तादृश अधिकार न रहातां नावाचे मात्र कामगार राहिले होते. नंतर सन १८५० त ताराराणी मालकीण इशींही तंटा पडला. तेव्हां तिला साजा पुरास घालविली. व तहनाम्या प्रमाणें तेथें तिणें तीन लक्षांचे जहागिरीचा उपभोग घ्यावा असें ठरलें.

६ कारभारी मंडळीस दूर केल्यावर देवराव जाधव याणें झाशीहून राघोपंत या नांवाच्या आणलेल्या मनुष्यास आपल्या हाताखालीं काम करण्यास नेमिलें.

७ या नंतर सन १८५१ त जयाजी राव शिंद्याची पाहिली राणी लक्ष्मी बाई ढ्ळी वारली. व देवराव जाधव याच्याही शरीरीं समाधान नाहींसें झालें. तेव्हां तेथील पोलिटिकल एजंट मेजर मालकम याणें त्याजला आपले कामाचा राजीनामा देण्यास सांगितलें. नंतर त्या कामावर राव दिनकर राव रघुनाथ यांस सन १८५२ चैत्र शुद्ध १ रोजीं नेमिलें. परंतु पुढें जयाजीराव शिंदा यास त्याचे राज्याची मुखत्यारी लौकरच प्राप्त झाली. यामुळें दिनकर राव जरी मुलुखाचें सर्व काम वहिवाटीत असे तरी त्यास दिवाण ह्मणूं लागलें.

८ देवराव जाधव याणें राजीनामा दिल्यावर पुढें कारभारी कोण करावा याचा विचार चालला, तेव्हां कांहीं उमेदवारांची नांवें निघालीं त्यां पैकीं दिनकर राव यांचेच नावानें दिवाण गिरी होण्याचा प्रकार झाला तो असाः—तवरघार नामें ग्वाल्हेरच्या ईशान्येस एक शिंद्याचा प्रांत आहे, तेथील लोक तवर हे प्राचीन काळा पासून बहुत शूर आहेत. त्यांस जरी महादजी शिंद्यानें मागें जिंकलें होतें, तरी ते नेहेमीं बंडखोरीत असत, मुलुखाचा वसूल मुरळीत पणें राजास देत नसत; आणि मोठी फौज असल्या वांचून ते दबले जात नसत; यास्तव दवलतरावाचे व त्या पुढचे कारकीर्दीत ही तो प्रांत शिंद्याच्या फौजेचा एक मोठा युरोपियन सरदार कर्नल जेकब नामें असे त्याजला फौजखर्चा करितां लाऊन दिलेला होता. त्यानें राजकीय विचाराकडे अगदीं अलक्ष करून त्यां तवर लोकांच्या उलाढाली स्वभावामुळें त्यांस अगदीं जेर करून भिकेस लाविलें त्यायोगें तेथील वसूल सहा लक्षांवर येण्या जोगा असतां सुमारें अडीच लक्षही वसूल होण्यास महान् प्रयास पडूं लागला. मागील लढाईचे पूर्वी कांहीं तवर लोक आपली दाद लागण्या करितां इंग्रजाकडे फिर्याद गेले होते. सबब लढाई. नंतर तो निकृष्ट अवस्थेस पोंहचलेला देश इतर देशां प्रमाणें मक्त्यानें न देतां रामराव फाळके व त्याचे हाताखालीं वसुलाचे काम पहाणारा यांनीं खालसांत वहिवाटीस ठेवून त्या कामावर भाऊ पोतनिसां कडील वजनदार कारकून राघोबा नामें असे त्यास नेमिलें. आणि त्याला सभा असें नाव दिलें. त्यांजकडून

तेथील मुलुखाची चांगली लागवड होऊन सरकारांत पूर्ण वसूल येऊं लागला. पुढें तो वारल्यावर त्या सुभ्याचें काम त्याचा पुत्र दिनकरराव याजकडे झालें. तेव्हां त्याणें आपल्या राजकीय गंभीर व दूरदृष्टी विचारें करून तेथील प्रजेस बहुत सुखी ठेविलें. तेथें स्वस्थता राहण्या करितां ठाणीं व पोलिस चौक्या यांचा बंदोबस्त, व तसाच वसुलाचाही बंदोबस्त उत्तम रीतीचा करून तीं कामें आपले हाताखालचे लोकांस चालवितां यावीं म्हणून दस्तुरउल अमल तवरघार नामें एक लहानसें कायदे बुक त्याणें केलें; व त्याप्रमाणें लोक काम करूं लागले. त्या पितापुत्रांचे अमलांत तवर लोक कांहीं बंडावे करीतच असत. त्यांजवर जरब पडण्या साठीं कांटिंजंटी पैकीं तेथें कांहीं फौज रहात असे. तिज बरोबर समय विशेषीं पोलिटिकल एजंट ही जात असे. तो दिनकर रावास राजकीय मसलतीस योग्य अशा तोडजोडी त्या तवर लोकांशीं करतांना व आपल्या अमलांत शांतता राहण्या करितां व वसूल उत्पन्न होण्या करितां चांगला बंदोबस्त राखतां व त्याणें केलेल्या कायद्यानुसार काम चालतांना पाहून त्याजवर बहुत खुष झाला; आणि सर्व राज्यांत असें काम चाललें असतां शिंद्याचें राज्य बहुत उत्तम स्थितीस येईल असें त्यास वाटलें. त्याची बदली झाली तेव्हां त्यानें ह्मणजे मेजर सर. रिचमंड, शेक्स पीयर याणें आपल्या दफतरांत दिनकररावाविषयीं उत्तम प्रकारचा लेख लिहून ठेविला. त्या वरून पुढें त्यालाच राज्याचा कारभारी नेमिला.

९ त्याला दिवाण गिरीचेकामावर नेमतांच त्याणें ग्वाल्हेरच्या राज्याचें रूपांतर केलें. यापूर्वीं शिंद्याचे राज्यांत मक्त्यानें मामले देण्याची चाल पडली होती, ते मक्तेदार रयतेचें हिताहित कांहींच पाहात नसत. हे मक्ते बहुत करून एकसाली असत, सबब ओंज आपण रयतेपासून सर्वस्व हरण करून घेतलें असतां ती पुढील साल पर्यंत टिकाव धरून सरकारास काय देईल याची त्यास काळजी नसे. ते आपल्या मक्त्याची मुदत भरे पर्यंत रयते पासून कोणत्याही उपायें करून पैसा काढून घेत. यांचा जुलूम एकाद्या हट्टी व शूर ठाकुरावर किंवा जमीदारावर होई, तेव्हां तो मात्र बंड करण्यास उभा राही. त्या प्रसंगीं त्याचे पराभवास शिंदे सरकारास फौज पाठवावी लागे. यामुळें रयतेला फा

स्य दुःख होई. या शिवाय हे मक्तेदार वसुलाचे कामांत निमग्न असल्या मुळें रयतेचें, गाऱ्हाणें ऐकणें, देशांत स्वस्थता ठेवणें, या विषयीं अगदीं दुर्लक्ष करी त. ही सर्व अव्यवस्था दिनकर राव यांणीं मनांत आणून मामुले मक्त्यानें देण्याची चाल प्रथम काढून टाकिली, व ग्वालह्यांत वहिवाट चालण्या करितां प्रांतोप्रांतीं सरसुभे, सुभे, कमाविसदार, ठाणेंदार, व खेरीज कारकून वगैरे नेमिले. आणि त्या सर्वांस कामाचे महत्वा प्रमाणें मुलुखांतील वसूल करणें, दिवाणी व फौजदारी विषयीं रयतेच्या तंटाच्या न्याय करणें, इत्यादि कामें वांटून दिलीं. तसेंच सर्वत्र शांती राहण्या करितां पोलीस चौक्यांचाही चांगला बंदोबस्त करून सर्व अधिकाऱ्यांवर एक महकमा किंवा कचेरी बंदोबस्त नामें स्थापून त्यांचे अधिपत्य त्यांणीं आपणाकडे ठेविलें. सर्व कामदार लोकांनीं सारख्या रीतीनें काम चालवावें या करितां त्यांस त्याचे विचारास युक्त दिसे त्या प्रमाणें तो एकदम हुकुम पाठवित असे. सुमारें पांच वर्षांचे अंतीं अनुक्रमानें सर्व हुकूम एकत्र जुळून पुनः शोधून त्यांस दस्तुरूल अंमल असें नाव दिलें; व तें ग्वाल्हेरचें कायदे पुस्तक या नांवानें छापून प्रसिद्ध केलें.

१० या गृहस्थाचे मनास लोकांनीं आपणास खरोखर चांगलें ह्मणावें ही आवड होती. ह्मणून यांणीं निर्लोभानें, निर्मत्सरानें व निःपक्षपातानें प्रजासुख वर्धनार्थ बहुत कामें केलीं. त्या सर्वांस एथें जागा नाहीं सबब इतकेंच पुरे आहे कीं, ग्वाल्हेरच्या राज्यांत जें शिरस्त्यानें काम होऊं लागलें, तें सर्व या सुज्ञ गृहस्था कडून झालें. हा शिरस्ता जरी कदाचित पुढें बदलला, तरी तो मूळपाया अथवा मूळतत्वावरून पडलेला शिरस्ता यास अगदींच सोडून भलत्या कलावर जाईल असें ह्मणवत नाहीं. दिवाणगिरीचें काम याजकडे झाल्यावर आपण नेमलेल्या कामदारांनीं रयते पासून सरकारांत किती पैसा घ्यावा हें जरूर होतें. ह्मणून त्यांणीं सर्व राज्यांत गावरांना पांच किंवा दहा सालाची जमींदारी पासून सरकारांत जी रकम यावयाची तिज बद्दल ठराव करून त्यांस पटे दिले. त्या वरून त्या लोकांस, ठरावा पेक्षां सरकार आपणा पाशीं जास्त मागणार नाहीं अशीखात्री वाटून आपापल्या गांवांत, ते झटून लागवड करूं लागले व तेणें करून सुखी झाले.

११ हा याचा बंदोबस्त, ज्या लोकांचें मागील वहिवाटींत हित होतहोतें, त्यांस न आवडून ते व दुसरे कांहीं लोक याचें अनिष्ट चिंतूं लागले. परंतु फार करून यापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. याच्या अमलांत राज्याचा बंदोबस्त प्रजासुखास इतका मानवला होता कीं, ग्वाल्हेर इलाख्याचा बंदोबस्त शेजारच्या इंग्रजी इलाख्याचे बंदोबस्ता पेक्षां प्रजेस बहुत सुखा वह वाटूं लागला. याचें कारण असें दिसतें कीं, हा अधिकारावर येण्यापूर्वीं ज्या लोकांनीं अयोग्य रीतीनें पैक्याचा अभिलाष केला होता, त्या गतगोष्टींकडे याणें आपलें लक्ष लाविलें नाहीं. जमीदारानें अमुक पैसा सालीना भरण्याचें कबूल केलें असतां कदाचित बाकी थकली तर त्याची जमीदारी लेलाव करून भलत्यास च विकीत नसे. देशांत स्वस्थता राखण्या करितां व न्याय होण्या करितां पोलिसचेलोक व न्यायाधीश स्थापिले असतां ही कदाचित कोठें खून झाला तर त्या खून करणारास फाशीं दिलेलें कोणी पाहिलेंच नाहीं. दिवाणी मुकदम्याचा न्याय होण्या करितां दिवाणी कामदार नेमलेले असून कोणाची घरजिंदगी उघड लिलावानें वकिलाचे अगर कोडताचे दस्तुरी करितां विकली गेली नाहीं. कामदारानें लांच खाल्यास तो परत घेण्याचे सर्व उपाय झाल्यावर याणें त्याच्या पायांत बिड्या घालून त्यास कैदेंत ठेविलें नाहीं. या शिवाय त्याणें कोणी ठाकूर व जमीदार यांणीं मुली न मारणें, गुलाम न करणें, व त्यांच्या बायकांनीं सती नजावें या विषयींही चांगला बंदोबस्त ठेविला होता.

१२ दिनकरराव यांस दिवाणगिरीचीं वस्त्रें दिल्यावर पुढें लवकरच जयाजी राव शिंदे अलिजाहा यांस त्यांच्या राज्याची मुखत्यारी मिळाली. व जसा दिनकर राव यांणीं राज्याचा बंदोबस्त केला, तसाच जयाजी रावांनीं फौजेचा बंदोबस्त केला. पूर्वीं पासून शिंद्याचे फौजेस एक किंवा दोन महिन्यांनीं ही मुशारा देण्याची चाल नवती. असें होण्याचें कारण शिंद्याचे खजिन्यांत पैका नवता असें नाहीं, परंतु वेतनाची बाकी ओढीत गेलें ह्मणजे त्यामध्यें कित्येकांचा फायदा होत असे. तो असा कीं, फौजेस कोठें काम लागलें ह्मणजे तीस बाहेर पाठवितेवेळीं आपणास खर्चास नाहीं ह्मणून अडून बसत असे. तिला वेतन देण्या विषयीं सरकारचा हुकूम झालेला नसला ह्मणजे ज्यांस हा-

ता खालीं ती फौज असे, त्याणें मध्यस्थ होऊन एकादा सावकार उभा करावा, आणि त्या शिपायांस कांहीं खर्चास देववावें. नंतर सरकारांतून त्या शिपायांचा पगार आला ह्मणजे तो दिलेला मदतखर्च व्याजसुद्धां कापून घेऊन बाकी जें उरेल तें त्याणें त्या शिपायांस द्यावें. हें व्याज मिळण्यासाठीं शिपाई लोकांचा पगार वांटला जाऊंनये ह्मणून दरबारांतही प्रयत्न होत. जयाजीराव शिंद्यानीं तीचाल अगदीं मोडून टाकिली; आणि फौजेस दरमहा किंवा दुमाही वेतन वांटलें जाण्याचा चांगला बंदोबस्त करून त्यांस चांगल्या प्रकारें कवाईत शिकविण्याचा आरंभ केला. पूर्वी कांहीं कवाईत शिकल्याशिवाय स्वार व पायदळ होते, ते कमी करून शिकलेले लोक जास्त ठेवण्याचें योजिलें. परंतु असें करीत असतां व्यंकोबा भोसला नांवं कोणी शिलेदारी स्वारांचा पुढारी असे, तो आपल्या स्वारां पैकीं कमी न करण्याविषयीं अट धरून आपल्या लोकांसह अडून बसला. त्याच्या ह्मणण्याप्रमाणें करावें तर त्या फौजेची सुधारणा होत नाहीं. शिवाय अशी हुकूम न मानणारी फौज असून व नसून सारखीच असें दिसून आलें. शेवटीं त्या अडून बसलेल्या फौजेवर त्याणें तोफांचा मार चालविला. तेव्हां त्यांतील मुख्यां पैकीं दोन तीन असामी पडल्यावर त्यांचा तो एकोपा मोडला; आणि जयाजीरावांनीं आपले मताप्रमाणें फौजेस कवाईत शिकविण्याचा हुकूम चालविला. बाडी गार्ड (राजाचें रक्षण करणार) नांवं एक पलटण, घोड्यांचा तोफखाना, व सहाशें स्वारांची एक पलटण यांची नवीन भरती करून तोफखाना व स्वार यांमध्यें सर्व निवडक मराठे लोक ठेविले. त्यास पगाराशिवाय त्यांचा सर्व खर्च सरकारांतून मिळे असें केलें.

१३. तारा राणी मागें साजापुरास रहाण्यास गेली होती, ती सन १८५५ त श्रावण मासीं मृत्यु पावली. याशिवाय विशेष वर्तमान घडलें नाहीं. महाराज व त्यांचे दिवाण हे कधीं कधीं आपल्या इलाख्यांत कामाकरितां व इंग्रजी इलाख्यांत देश पहाणें व यात्रा करणें याकरितां जात असत.

या प्रमाणें सर्वत्र शांतता झाली असतां सन १८५६ च्या आरंभीं लार्ड क्यानिंग हिंदुस्थानांत आल्यावर मध्य हिंदुस्थानांतील राजांची माहिती करून घेण्याकरितां दुसऱ्या वर्षी पर्जन्यकाळीं सर राबर्ट हामिलटन (त्यावेळचे गवरनर

जनरलचे मध्य हिंदुस्थानांतील एजेंट) यांस कलकत्यास बोलाविलें. ते जाऊन आल्यावर त्यांस महाराज व त्यांचे दिवाण यांणीं कलकत्यास आलेल्या नवीन गवरनर जनरलांस भेटण्याकरितां जाण्याची इच्छा प्रदर्शित केली. यासमयीं भेटीस जाण्याचीं कारणें आंतून काय असतील तीं असोत, परंतु राजकीय कारणांकडे अवलोकन केलेंअसतां असें दिसून येतें कीं, माजी गवरनर जनरल लार्ड डाल हौसी यांचे कारकीर्दींत नागपूरकर भोसला व आणखी बहुत लहान लहान संस्थानिक निपुत्रिक वारल्यामुळें तीं राज्यें (लखनौ एथील राज्य घेण्यास तेथें बेबंदीचें कारण लाविलें होतें.) इंग्रजांनीं आपल्या राज्यास जोडलीं. सबब शिंद्याच्या राज्याविषयीं तशा कलमाचा निराळाच तह असावा. प्रसंगीं दत्तक घेतला असतां त्याला इंग्रजांनीं मान्य करावें. सन १८४४ च्या आरंभीं उभय सरकारांचा तह ठरला; त्याप्रमाणें कांटिंजेंट फौजेचे खर्चाकरितां मुलूख लावून दिला. त्यांत वसूल कमी होतो असें दाखवून इंग्रजांनीं शिंद्याकडे सुमारें नऊ लक्ष रुपये घेणे बाकी काढून ती मागूं लागले. ती मागूं नये अगर खर्चास लावून दिलेला मुलूख परत देऊन नगदी पैसा घ्यावा; व दक्षिणेंत शिंद्याचा लावून दिलेला मुलूख परत देऊन नगदी पैसा घ्यावा. दक्षिणेंत शिंद्याचा मुलूख जिकडे पसरलेला आहे; त्याचा बंदोबस्त करणें, हें तेथें उभय सरकारचा अंमल असल्यामुळें कठीण पडे. सबब तो देऊन त्याचे बदल झांशी शहर व त्या खालचा कांहीं मुलूख घेणें, व आणखी अशींच दुसरीं कित्येक कृत्यें, ज्यांचा उलगडा पोलिटिकल एजेंट यांचे मार्फत होणे नाहीं, त्यांचा कलकत्यास समक्ष जाऊन करून घेणे होता. सबब नवीन गवरनर जनरल साहेब यांचे भेटीस जावयाचें आहे, याविषयीं सर्व कारणांची संधी साधून कलकत्यास भेटीकरितां यावयाची मान्यता मागून घेण्यास दिवाणानें महाराजांस प्रवृत्त केलें असावें असें वाटतें. ही गोष्ट लार्ड क्यानिंग यांणीं मान्य केली.

१४ या नंतर जयाजी महाराज आपणा बरोबर कांहीं निवडक सरदार व दिवाण दिनकरराव यांस घेऊन निघाले ते सन १८५७ च्या आरंभीं कलकत्यास पोंचले. तेथें गवरमेंट हाऊस मध्यें मोठें दरबार भरून लार्ड क्यानिंग यांणीं

या राजाची मानमान्यता बहुत राखिली. नंतर स्वारी सुमारें दोन महिन्यांत परत ग्वाल्हेरीस आली

१५ कलकत्यास असतां महाराज व दिवाण यांणीं आपल्या मतलबाच्या गोष्टींचा उलगडा करून घेतला असावा; परंतु पुढें लवकरच बैदा झाला यामुळें सर्व जबाब उलगडले असतील असें वाटत नाहीं.

१६ ज़याजी राव महाराज या वर्षीं रंग पंचमी झाल्यावर कलकत्याहून ग्वाल्हेरीस पोंहचले; यामुळें येथें आल्यावर एके दिवशीं रंगाचा समारंभ करण्याचा हुकूम देऊन सर्व लश्करी व दुसऱ्या सरदारासहवर्तमान रंग खेळ झाला. त्या समयीं रंग इतका झाला होता कीं शहराच्या सराफ्याचे रस्त्याच्या फरसा वरून रंग वहात चालला होता. व सर्व पुराणे लोकही ह्मणूं लागले कीं, महादजी शिंदे पुण्यास रंग खेळले होते त्या नंतर असा रंग कधीं झाला नवता.

१७ याप्रमाणें शिंद्यांचें राज्य व फौज यांचा चांगला बंदोबस्त होऊन सर्व प्रकारें शांतता झाली असतां, कलकत्यास गेलेल्या मंडळीस पुढें होणाऱ्या बैद्याचीं लक्षणें दिसूं लागलीं होतीं. त्यांविषयीं पुढील भागांत लिहिण्यांत येईल.

१८ यापूर्वीं बायजा बाई उज्जनीहून शिंद्याच्या लश्करांत येऊन राहिली होती.

---

## भाग १२.

—000—

सन १८५७ च्या आरंभीं ग्वाल्हेरचे दरबारी लोक कलकत्यास गेले होते. तेव्हां त्यांणीं बराकपूर व अंबाला या दोन ठिकाणच्या पलटणींनीं बैदा केल्याची बातमी ऐकिली. याशिवाय कलकत्यास ही स्वदेशीय पायदळ पलटणीचे लोक इंग्रजा विरुद्ध भकत असत. परंतु ते बंड करतील असें त्यावेळीं कोणाचेंही मनांत आलें नवतें. नंतर शिंदे ग्वाल्हेरीस परत आल्यावर मे महिन्याचे ५ वे तारखेस मिरत एथें स्वदेशीय इंग्रजी फौजेनें बंड करून आपल्या युरोपियन सरदारांस मारिलें. यानंतर हा बैदा उत्तरेतर इतर ठिकाणीं ही अधिकाधिक वाढत चालला.

त्याविषयीं एथें लिहिणें जरूर नाहीं, परंतु ज्या गोष्टी त्यापैकीं शिंद्याच्या संबंधानें, अथवा शिंद्याचे राज्यांत घडलेल्या असतील त्यांविषयीं लिहिणें आवश्यक आहे.

२ मिरत व दिल्ली एथील बंडाची बातमी देशांत प्रगट झाल्यावर आग्रा एथील अधिकाऱ्यानें ग्वाल्हेरच्या कांटिंजेंट पैकीं स्वारांची मदत मागितली. तेव्हां त्यावेळचा पोलिटिकल एजंट मेजर मेकफरन याणें शिंदे महाराज यांस विचारून सत्वर रवाना केली. आणि दिवाण दिनकर राव त्या समयीं तवरघार जिल्ह्यांत अंबहा मुक्कामीं होते. त्यांस पुढें मसलतीकरितां बोलाविलें. पुढें थोडक्याच दिवसांनंतर चोंहीकडून बंडाच्या भयंकर बातम्या येऊं लागल्या. तेव्हां शिंद्यानीं आपली स्वतां तयार केलेली बाडी गार्ड पैकीं स्वार व तोफखाना इंग्रजांचे मदतीस पाठविण्याची इच्छा प्रदर्शित केली. त्या फौजेवर कोणी एक गणपत राव चवाण यास नेमून ती आग्र्यास रवाना केली. इंग्रजांच्या तर्फेनें तिजबरोबर कप्तान क्यांबल नामें ग्वाल्हेरीस इंजिनीयर होता तोही गेला. नंतर इटाव्याचे फौजेनें बैदा केल्यामुळें ग्वाल्हेर कांटिंजेंट पैकीं पहिली पलटण व खटक्याचे स्वारांपैकीं दोनशें स्वार तेथें पाठविले. याच फोजे पैकीं स्वारांची एक रेजिमेंट माळव्यांत होती, तीही आग्रा एथें लढण्याकरितां गेली.

३ परंतु या पूर्वीं जून महिन्याचे आरंभींच शिंद्याचे कांटिंजेंटपैकीं, राहिलेली फौज बंडाचा प्रादुर्भाव दाखवूं लागली. या फौजेची छावणी शिंद्याचें लश्कर नामें नवीन शहरापासून तीन कोशांवर घातलेली आहे. ती ज्या नदीच्या कांठीं आहे, तिचें नांव मुरार. यावरून त्या छावणीस मुरार असें नांव पडलें. एथील फौज बिथरणार असें पाहून ती फौज तूर्त इंग्रजांनीं शिंद्याचे स्वाधीन करून, आग्र्यास जावें, असें दिवाण दिनकर राव यांणीं सुचाविलें होतें; परंतु त्या पलटणीवरील साहेबांनीं आपल्या शिपायांवर अतिशय विश्वास ठेवून ती गोष्ट मान्य केली नाहीं. पुढें त्या फौजेंतील लोकांचीं मनें दिवसेंदिवस अधिकाधिक बिघडूं लागलीं. तेव्हां जयाजी महाराजानीं आपली खासगत आग्र्यास पाठविलेली फौज परत बोलाविली. कारण, कांटिंजेंट फौजेनें बैदा केल्यास आपलें व इंग्रजांचे रक्षण करण्यास विश्वासू फौज जवळ नवती.

४ यानंतर कांटिंजेंट पैकीं सातवी पलटण निमच एथें होती, तिणें व कप-

तान काकवर्न याजबरोबर आग्र्यास रवाना केलेले स्वार हातरस जवळ होते, त्यांणीं बंड केल्याची बातमी मुरार एथें फौजेस कळली. तेव्हां हे शिपाई इंग्रजां- विरुद्ध बहुतच भकूं लागले. इतक्यांत झांशी एथील फौजेनें बंड केलें. त्याचें निवारण करण्यास या कांटिंजेंट फौजेचा कांहीं भाग तारीख १० वी जून रोजीं इंग्रजांनीं झांशीकडे पाठविला. परंतु ते लोक छावणी सोडून सुमारें तीन कोश दूर गेल्यावर आपण बंडवाल्याशीं लढणार नाहीं असें ह्मणूं लागले. तेव्हां ती फौज परत आली. दुसरे दिवशीं इंग्रज लोकांस त्या शिपायांचा अविश्वास वाट- ल्यामुळें तेथील बहुतेक युरोपियन लोक शिंद्याचे वाड्यांत आश्रयास आले. परंतु १२ व्या तारखेस त्या शिपायांवर पुनः विश्वास ठेवून ते मुरार मुक्कामीं रहा- ण्यास गेले. पण तारीख १३ वी आदितवार रोजीं दोनप्रहरीं त्या शिपायांनीं दोन बंगले जाळिले. व रात्रीं राहिलेले जाळून जे युरोपियन त्यांस सांपडले ते त्यांणीं ठार मारिले. त्यादिवशीं त्यांणीं सुमारें १७ लहान मोठीं युरोपियन मनुष्यें मारलीं. त्यांत मेजर ब्लाक व डाक्टर कर्क हे मुख्य होते. बाकी राहिलेल्या लोकांपैकीं बहुतेक फुलबागेंत जयाजी महाराज रहात असत तेथें आले. त्यांत प्रथम ब्रिगेडियर रामसे ह्मणून फौजेचा मुख्य अधिकारी होता तो आला.

५ ही बातमी मेजर मेकफरसन साहेब पोलिटिकल एजेंट यांस कळली. त्यांचें रहाण्याचें स्थान रेसिडेनसी, जें मुरारेपासून तीन कोशांवर आहे, तें होतें. नंतर त्यांणीं दरबारचा वकील श्रीनिवास गोविंद यास बरोबर घेऊन महाराजां- कडे जाण्याचें योजिलें. परंतु रात्रीं कोठें दंगा होईल तो समजणार नाहीं, व बरोबर नेण्यास भरवसा ठेवण्याजोगे रखवालदारही नाहींत. अशा समयीं तेथें, मागें व्यंकोबा भोसला मारला गेला त्याचे लोकांपैकीं कांहीं स्वार आपली दाद लागण्याकारितां राहिलेले होते, ते खचीत उपयोगी पडतील असें जाणून त्या संकटसमयीं दरबारच्या वकिलानें त्यांवर भरवसा ठेवण्यास पोलिटिकल एजेंट यांस सांगितलें. त्यासमयीं तो त्या स्वारांस व वकिलास बरोबर घेऊन शिंदे महाराजांकडे येण्यास निघाला. तो शहरांत येण्याच्या पूर्वीं कांहीं बिघडलेले स्वार रेसिडेनसीकडे जांत होते, त्यांणीं त्यांस अडविलें, परंतु इतक्यांत शिले- दारी स्वारांनीं मध्यें पडून त्या साहेबास एकीकडे नेलें. व त्या लोकांस त्यांणीं

कांहीं भुलथाप देऊन दूर केलें, आणि त्यास प्रथम वाड्यांत आणून नंतर फुलबागेंत सुरक्षित पोंहचविलें.

६ त्यासमयीं महाराज, दिवाण, व आणखी कांहीं सरदार फुलबागेंत जमले होते. व मुरारचे वांचलेले बहुतेक युरोपियन लोक तेथें आलेच होते. या सर्वांच्या विचारें ठरलें कीं, इंग्रजांनीं तूर्त आग्र्यास जावें. मग शिंद्यांनीं त्यांस कांहीं गाड्या व बग्या देऊन व आपल्या बाडी गार्ड पैकीं शंभर स्वार रखवालीकरितां स्वाधीन करून तारीख १४ रोजीं प्रातःकाळीं रवाना केले. परंतु त्यां स्वारांनीं युरोपियन लोकांस संकेता प्रमाणें पोंहचविण्यापूर्वीच शिंद्यानीं त्यांस परत बोलाविलें. याचें कारण असें वाटतें कीं, इंग्रज लोकांस आपण उघडपणें मदत दिली तें ऐकून मुरारची बिथरलेली फौज त्या गोष्टीचा आक्षेप घेऊन आपणांवर हल्ला करील. सबब तो संशय दूर करण्याकरितां त्या पाठविलेल्या स्वारांस परत यावयाचा हुकूम पाठविण्या विषयीं महाराजांचे मनांत नसतांही त्यांणीं आज्ञा दिली असावी. हे स्वार परत येऊं लागले तेव्हां इंग्रज लोक बहुत संकटांत पडले; कारण कीं, त्या लोकांस अडविण्याकरितां पुढें चंबळा नदीवर कोणी जहागीरखान नामें आपल्या कांहीं लोकांनिशीं जाऊन बसला आहे, असें त्यांणीं ऐकिलें होतें. परंतु ही त्यालोकांस नुकतीच लागलेली बातमी, आग्र्यास जाण्याचा रस्ता ज्या शिंद्याच्या तालुक्यांतून आहे, त्याचें नांव जिगणी, तेथील नायब कमाविसदार रामचंद्र अनंत हा त्या समयीं तेथें वसुलाच्या कामाकरितां होता, त्यास समजली. मग तो बळदेवशिंगवगैरे बरोबर घेऊन तेथें आला. बळदेवशिंग हाजारा ह्मणून आग्र्याचे सडकेवर गांव आहे, तेथील जमीदार होय. याणें तत्क्षणीं आपल्या गांवाहून कांहीं जमीदारी फौज मागविली आणि मोठा कोथरीचा रस्ता सोडून राजघाटानें त्या लोकांस शिंद्याचे मुलुखापार सुरक्षित पोंहचवून पुढें आग्र्यास पोंहचविण्या करितां त्याणें त्यांस धोलपूरचे राण्याचे हवालीं केलें.

७. सन १८४३ चे अखेरीस जी शिंद्याची इंग्रजांशीं लढाई झाली, तींतफौज खर्चास जो मुलूख लावून दिलाहोता, त्याचे उत्पन्नांतून या शिंद्याचे कांटिंजेंट फौजेचाखर्च भागत असे. तथापि त्या फौजेशीं व शिंद्याशीं दरवर्षी एकवेळ

दसऱ्याचे दिवशीं मात्र रामराम होण्याची वेळ येई. या शिवाय त्यांशीं कांहीं संबंध नवता. यामुळें ती फौज शिंद्याचे कांटिंजेंट या नांवाखेरीज सर्व प्रकारें इंग्रजांचे इतर फौजे प्रमाणेंच होती. तिजपैकीं पुढारी लोकांनीं कांहीं इंग्रेज लोकांस मारल्यावर महाराज यांजकडे फुलबागेंत येऊन ते ह्मणूं लागले कीं, तुह्मीं आह्मांशीं मिळून इंग्रजांशीं लढण्यास आमचे पुढारी व्हावें. हे शब्द जरी महाराज व दिवाण यांस दुःसह झाले, तरी त्यांस घरच्या फौजेचाही भरंवसा नवता. यामुळें सहन करणें भाग पडलें. मग निरुपाय होऊन त्याच दिवशीं सायंकाळीं शिंदे महाराज आपल्या बरोबर कांहीं निवडक स्वार घेऊन मुरारेस गेले. आणि कोणत्याही रीतीनें स्थिरता होण्याकरितां, त्या शिपाई लोकांस सांगितलें कीं, जर तुह्मी शिंद्याचे चाकर असाल तर तूर्त कमरा सोडून छावणींत जावें. त्यावरून त्या लोकांनीं तसेंच केलें.

८ या कांटिंजेंट फौजे पैकीं पांचवी पायदळ पलटण सिप्रीस रहात असे. तेथें या ग्वालेरच्या बुंडाची बातमी ऐकण्या पूर्वींच असा चमत्कार झाला होता कीं एके दिवशीं एका शिपायांनें वाण्याचे दुकानांतून आटा घेतला आणि रोटी करीत असतां, त्यांत त्यास एक हाडाचा तुकडा सांपडला. सामान्य दिवसांत अशी गोष्ट घडली असतां ती कोणी मनावरही घेतनाहीं. परंतु या ऐन निकैराचे वेळीं आसपासचे देशांत अशी कांहीं बातमी उडाली होतीकीं, इंग्रेज लोक हिंदु लोकांस वाटविण्याकरितां धान्या बरोबर हाडें दळून तो आटा विकतात. या उठविलेल्या खोट्या बातमीचे संबंधानें आट्यांत हाड सांपडलेल्या शिपायानें कांहीं दुसरे शिपाई आपणास मथवून बाजारांत जाऊन त्या वाण्यावर हल्ला केला. तेव्हां त्या गर्दीचें शांतवन होण्या करितां, त्या पलटणीचा मुख्य युरोपियन सरदार होता त्याणें त्या वाण्यास कांहीं दंड केला. नंतर थोडक्याच दिवसांत त्यापलटणी शिपायांनीं आपल्या एक दोन युरोपियन सरदारांस मारिलें. बाकीचे पळाले. त्यांतून कांहीं गुण्याकडे गेले. तेथें मीर आमजद अली ह्मणून एक रिसालदार होता, त्याणें त्यांस वांचविण्याचें मनावर घेऊन आपले कांहीं विश्वासू स्वार बरोबर घेतले, आणि त्या महान् संकटांतून त्या युरोपियन लोकांस वांचवून रजपूतना एथें चांगल्या आश्रया-

स नेऊन पोंहचाविलें. सिप्रीहून दुसऱ्या एका युरोपियन टोळीनें जंगलचा रस्ता धरला. ती बातमी तेथील कमाविसदार व नगर जिल्ह्याचा सुभा माधवराव अनंत या शिंद्यांचे कामदारांस कळली. तेव्हां त्या कामदारांनीं त्यांस, पलटणी लोकांचे हातीं न सापडत आशा जागीं नेऊन ठेविलें होतें. मुरार येथील सर्व फौज रवाना झाल्यावर दिनकरराव दिवाण यांणीं बळदेव शिंगु आरेवाला, ज्याणें मुरार एथील गेलेल्या युरोपियन लोकांस मदत दिली होती, त्याजकडील माणसांची एक टोळी त्या एकांत जाग्यांत पाठवून त्या युरोपियन लोकांस आग्र्या एथें सुखरूप पोंहचतें करविलें. तींत एक कपतान, दोन तोफखान्याचे सारजन, कांहीं बायका व कांहीं मुलें होतीं.

९ यानंतर ग्वाल्हेर कांटिंजेंटीची सर्व ठिकाणची फौज बिघडून ती मुरार एथें जमा होऊं लागली. तींतील शिपाई लोक ती छावणी लुटून ओस पाडूं लागले, व युरोपियन लोकांचें सर्व सामान शहरांत विकावयास आणूं लागले. त्या लोकांस तसें न करूं देण्याचा बंदोबस्त महाराज साहेबांचे हातून झाला नाहीं. या बैद्यापूर्वीं कांहीं दिवस अगोदर कांटिंजेंट फौजेचे एका टोळीनें कछवायघारेंतून दोन लक्ष रुपये आणले होते. व इंग्रजांचा ग्वाल्हेर एथील खजिना महाराज यांजकडे होता, तो आपले हवालीं करावा व आपणा बरोबर लढण्यास चलावें, असें ते महाराजांस ह्मणूं लागले. व शहरावर हल्ला करण्या करितां त्यांणीं तोफाही रोखिल्या. त्यावेळीं त्यांशीं कांहीं बोलण्या करितां कोणीच धजेनात. तेव्हां भैरवशिंग नामें शहराचा कोतवाल होता, त्यास तेथें बोलण्या करितां पाठविलें. तो अयोध्येचा रहाणारा होता, सबब त्याला त्या लोकांमध्यें जाऊन बोलण्यास कांहीं नड पडली नाहीं.

१० शिंद्याचे राजधानींत असे बैदे होऊं लागले, व इलाख्यांतही बंड झालें होतें. त्यांत प्रथम बायघार इलाख्यांतील एक मुरलीधर चवधरी ह्मणून होता तो पूर्वीं पासूनच बंडखोर असे. त्याचा मुलगा जमीपाळ याणें आपलें कांहीं लोक जमाकरून इंग्रेजी इलाख्यांत चाल केली. आणि चंबळानदी जवळच कांहीं अंतरावर एक बाहा ह्मणून गांव आहे, तो लुटला. तेथून शिंद्याचे इलाख्यांत येऊन तवरघारेंत एक आयणो याजांबाचा तालुका आहे, तेथी-

क कमाविसदारास घालविलें. या शिवाय नरवर इलाख्यांत पाढोण संस्थान-च्या राजा मानसिंग याणें शिरी मुक्कामीं एका शिंद्याच्या कमाविसदारावर ह-ल्ला केला. तेव्हां तोही ठाणें सोडून आला. शिंद्याच्या मुलुखांत असे बेंदे होऊं लागले, तेव्हां देशांत स्वस्थता राखण्यास आपल्या कामदारांचा आग्यावर टि-काव लागणार नाहीं असें समजून दिनकर राव याणीं बंडांतील मुख्य जमीदार व ठाकूर होते, त्यासर्वांस आपापले लोक घेऊन राजधानीचे रक्षणास येण्या-विषयीं निमंत्रण केलें. तेव्हां त्यांची एकंदर २०००० वीसहजार फौज जम-ली. ही फौज प्रसंगास लढाई करण्यास उभी राहील या विषयीं संशयच होता. परंतु कांटिंजेंट फौज जेव्हां शिंद्यास कांहीं हट्टाचे जबाब करी, तेव्हां तोस आपणाकडे लढण्यास इतकी फौज आहे असें सांगण्यास सांपडे. ही बाळगण्या-स खर्च जरी जास्ती लागला, तरी हे बेंदेखोर लोक इलाख्यांत न राहिल्यामु-ळें स्वस्थता राहून त्यासालीं पर्जन्यही चांगला पडला होता, सबब दरवर्षा पेक्षां बेदा खर्च ह्मणून रुपयास दोन आणे प्रमाणें जास्ती वसूल अविच्छिन्न प-णें घेतला गेला. इतकेंही असून सर्व बेदा झाल्यानंतर लढाई करून पुनः शां-तता करण्याकरितां जोखर्च लागला असता त्यापेक्षां जमीदारी फौज बाळग-ण्यास कमी लागला.

२१ इतकेंही करून शेवटीं सर्व इलाखा बंडाशिवाय राहिला असें नाहीं. संबळगड इलाख्यांत एका ठाकुरानें बंड केलेंच. त्याजवर तेथील सुभा गोविं-दराव विठ्ठल याणें आपली शिबंदी बरोबर घेऊन हल्ला केला. त्यांत तो ठाकूर मारला गेला. शिंद्याच्या माळवाप्रांतांत मंदसोर एथील शिबंदींत मुसलमान लोक होते, त्यांणीं तेथील कमाविदारांस ठार मारून तें शहर बळकाविलें. त्या शहरांत सावकार लोक होते, त्यांस ते उपद्रव देऊं लागले. त्यासमयीं तेथील सुभाकृष्ण-राव अनंत हा तेथें नवता. त्या बंडाची बातमी ऐकून आपला तूर्त कांहीं इलाज चालणार नाहीं असें समजून तो आडवाटेनें ग्वाल्हेरीस आला. इसामडच्या इला-ख्यांत कांहीं बुंदेले लोकांनीं बंडाळी माजवून चंदेरीनामें मजबूद किल्ला बळ-कावून घेतला. पाढोनच्या राजा मानसिंग याणें शिरीचें ठाणें घेतल्यावर, पोहरी नामें शिंद्यानें शिवोळ्यास जहागीर दिलेला एक तालुका आहे, तेथेंही तो उप-

द्रव देऊंलागला. याशिवाय राघोगडचा राजा जरंगड एथें उपद्रव करील अशी चिन्हें तेथील अधिकाऱ्यांस दिसूं लागलीं होतीं. व भिंडनामें जिल्ह्यांतही कांहीं बंडवाले जमले होते, परंतु त्यांपासून विशेष दंगा झाला नाहीं.

१२ हें वर्तमान जून व जुलाई या महिन्यांत होत होतें, इतक्यांत ग्वाल्हेर कंटिजेंटची सर्व फौज मुरारेस जमली. तींत एक सातवी पायदळ पलटण मात्र निमचेहून बंड करून निघाली ती आग्र्यास जाऊन दिल्लीस गेली. बाकी सहा पायदळ पलटणी, दोन स्वारांच्या पलटणी व सहा तोफखाने इतकी फौज जमा झाली. ती पुढें आग्रा एथें इंग्रजांस उपद्रव देण्यास जाईल, असा तिचा निश्चय दिसला. त्यासमयीं आग्रा एथील अधिऱ्यांचें सांगणें आलेंकीं, कांटिंजेंट फौज तेथेंच कोणत्याही उपायानें अटकावून ठेवावी. त्यावरून त्या फौजेस माहीपगार व तिमाही पगाराइतकें इनाम देऊन तिची स्थिरता केली. ती शिंद्यास आपले पुढारी होऊन लढाईस चालण्यास सांगत होती. त्याणें दसरा झाल्यावर तसें करूं ह्मणून सांगितलें. असें करण्याचा हेतु इतकाच होताकीं, तिशीं लढण्यास इंग्रज लोक कानपूर अगर आग्रा एथें शक्तिमान होतपर्यंत इणें एथेंच रहावें.

१३ नंतर इंदुरास इंग्रजी पलटणी लोकांनीं बेदाकरून शिंद्याच्या इलाख्यांत आगष्ट महिन्यांत चाल केली. नंतर त्यांणीं आपण व कांटिंजेंट मिळून आग्र्यास जाण्याचा बेत केला. परंतु होईल त्या रीतीनें याफौजेस अडविण्यास वरिवार तेथील इशारे येत असत. यामुळें त्या दोन्ही फौजांत कलह उत्पन्न झाला. यास्तव ती इंदुराकडून आलेली फौज मात्र सुमारें एक महिना राहून आग्र्याकडे चालती झाली.

१४ हें इंदूरचे बंडवाले गेले त्यांवेळीं ग्वालेरीस, (दिल्ली पासून फरकाबादे पर्यंत इलाख्यांतील, तसेंच रोहिल खंडांतील) जे मुसलमान शिंद्याचे चाकरीस होते, त्यांपैकीं कित्येकांच्या मनांत लढाईचा आवेश येऊन त्यांतून कित्येकांनीं मुसलमानी धर्माच्या लढाईचा झेंडा उभारला. आणि सुमारें पांच सहाशें लोक जमून त्या इंदुरवाल्या बंडखोरांबरोबर चालते झाले.

१५ यापूर्वीं कानपूर येथें बंडवाल्यांचा मोड होऊन तें शहर व ब्रह्मवर्त हीं इंग्रजांनीं घेतल्याची बातमी आली होती. व दिल्लीस सपंबरच्या विसाव्या तार-

लेस इंग्रजांनीं दिल्ली शहर पुनः घेतल्याची बातमी आली. ही ऐकून शिंदे व त्यांचे दिवाण आणि दुसरे आणखी सरदार हे इंग्रजांचे पूर्ण पक्षपाती आहेत व हे गोऱ्या लोकांस एथेंच आणून आपल्यास मारवितील असें समजून शिंद्यानीं आपणा बरोबर लढण्यास यावें नाहींतर त्यांची राजधानी लुटूं, असा बेत करून त्यांणीं मुरार नदीचे आलीकडे येऊन शिंद्याचे फौजेशीं लढण्याकरितां मोरचेबंदी केली. तेव्हां शिंद्याच्या खासगत फौजेपैकीं, सर्वांवर भरवसा ठेवण्या जोगी जरी नवती तरी, कांहीं फौज लढाईचे डौलानें फुलबाग व शत्रूची फौज यांमध्यें आणून तेथें त्याबंडवाल्यांचें पुढें येणें बंद होण्याकरितां, ठेवून कांहीं तोफाही लाविल्या.

१६ यावर्षीं शिंद्यानीं दसऱ्याचा समारंभ मोठ्या थाटाचा केलाहोता. त्यासमयीं सालाबादी प्रमाणें कांटिंजेंट फौज आपण सलामी करण्याकरितां येतों असें ह्मणत होती, परंतु शिंदे महाराजानीं तीस येऊं दिलें नाहीं.

१७ इतक्यांत कानपुराहून तात्या टोप्या येऊन आपणास मदत करावी ह्मणून कांटिंजट फौजेस बोलवण्याकरितां आला. व ता० १० वी अक्टोबर रोजीं आग्रा मुक्कामीं इंदूरच्या बंडवाल्यांशीं इंग्रजांची मोठी लढाई होऊन त्या बंडखोरांचा अगदीं नाश झाल्याची बातमी आली. त्या वेळीं ही फौज बहुत उतावीळ होऊन आपल्यास कांहीं खर्चास व बहार बाडबिछायतीकरितां गाड्या मिळाल्यास सर्व निघून जाऊं असें ह्मणूं लागली. तेव्हां तींत जे शिंद्याचे इलाख्या पैकीं लोक होते, त्यांस आपापल्या घरीं जाण्याविषयीं आंतून सांगितलें, आणि त्यांजवळ लुटीचा माल विकून पैसा बराच जमला होता; तो घेऊन कांहीं लोक आपाल्या घरीं गेले. या शिवाय शिंद्यानीं त्यालोकांस सांगितलेंकीं, ज्यांची इच्छा या राज्यांत चाकरी करावयाची असेल त्यांणीं त्यांतून निराळें व्हावें. त्यावरून पांचवी पायदळ पलटण व दुसरी स्वारांची एक रेजिमेंट यांणीं ती गोष्ट कबूल करून महाराजांची चाकरी धरली.

१८ बाकी राहिलेल्या फौजेस वाटूं लागलेंकीं, आपण इंग्रजलोकांस मारलें आहे, सबब ते आपला सूड उगविण्यास कदापि चुकणार नाहींत. इकडे शिंद्याच्या मनांत आलेंकीं, ही फौज आपल्या शेजारीं राहिली असतां आपल्या राज्याच्या नाशास प्रवृत्त झाल्याशिवाय उगीच राहाणार नाहीं. याखेरीज ती

आग्र्यास न जातां कानपुरास जातों ह्मणत्ये. तेथें युरोपियन लोक या लोकांशीं लढण्यास शक्तिमान आहेत, यास्तव त्यांचा उपद्रव आपणास नव्हावा ह्मणून आसपास इलाख्यांतून दिवाण दिनकरराव याणीं गाड्या व बैल जमाकरण्याचा हुकूम देऊन गाड्या आल्यावर त्यांस त्यागाड्या व आणखी कांहीं ऐवज देऊन कानपुराकडे चालतें केलें. तात्या टोप्या ही त्यांजबरोबर गेला.

१९ यापूर्वीं शिंद्यांस त्याणें, इंग्रजांचे वहिवाटीस पूर्वी दिलेल्या मुलुखांत पाहिजे असल्यास, अंमल करावा असें सांगितलें होतें. त्यावरून लक्ष्मणराजाराम यास कछवायघारत पाठविलें. त्याणें तेथें जाऊन कांहीं दिवस अंमल केला. तसाच पांडुरंग बाबा याचे मार्फत कोणी एक कारकून हरदाहंडा एथें गेलाहोता, त्यास दक्षिणेकडून आलेल्या इंग्रजी फौजेनें बंडखोर असें समजून ठार मारिलें.

---

## भाग १३.

शिंदेसरकार आपल्या राजधानी संनिधचे शत्रूंशीं युक्तीनें वागून त्यां पासून होणारा नाश व अपजय मोठ्या संकटानें टाळीत असतां सोपूर प्रांतांत बडोद ह्मणून एक शिंद्याच्या राज्यांत लहान संस्थान आहे, तेथील राजा व त्याचा मुलगा यांणीं सोपूर किल्यास वेढा घातला. तेथील सुभा गोविंदराव विठ्ठल नामें होता त्याशीं लढून त्याचे कांहीं लोक व विठ्ठलपंत नामें कारकून यांस धरून नेलें. त्याचें पारिपत्याकरितां त्यासुभ्यानें वारंवार आपणास फौजेची मदत मागीतली. परंतु मुरारचे फौजमुळें दुसरा कोणताही विचार करण्यास आवकाश झाला नाहीं. तत्रापि शिकरवारी इलाख्यांत कांहीं फौजहोती ती व मामुरखान याचे हाताखालच्या गोल (वे कवायती पलटण) अशी त्रिंबकराव केळकर याजबरोबर देऊन ती सुभ्याचे कुमकेस पाठविली. तिणें प्रथम मानपूर नामें एक सोपूरचे वाटेवरची गढी राजाचे फौजेनें घेतली होती तिशीं लढून ती परत घेतली. आणि पुढें चाल करून सोपुरास गेली. तेथें राजाची फौज बहुत असल्यामुळें तीफौज शत्रूशीं मैदानांत लढण्यास शक्तिमान न होऊन तिणेंही किल्याचा आश्रय घेतला; आणि बाहेर न येतां आंतूनच राजाशीं लढत राहिली.

२ यांशिवाय कोतवाल नांवें परगण्यांत अजनोधा एथें व शिकरवारी इलाख्यांत घुरया बसई एथें बंडें झालीं.

३ असें वर्तमान चाललें असतां शिंदे व त्यांचे मसलतदार कांटिंजेंट फौजेचे भयापासून नवंबर महिन्याचे आरंभीं मुक्त झाले. आणि त्यांनीं आपल्या इलाख्यांत शांतता करण्याचा उद्योग चालविला. त्यांत प्रथम मध्यहिंदुस्थानी व एजेंट कर्नल डूरंड याणें मुंबई कडील आलेली फौज बरोबर घेऊन धारच्या बंडवाल्यांचा पराभव केला. मग तो मंदोसरास आला. तेथील बंडखोरांशीं लढून त्यांस हाकून दिलें. व कित्येकांस मारून तें शहर व त्याखालचा मुलूख, माळव्यांतील शिंद्याचा सरसुभा हरिनारायण आपटे, याचे स्वाधीन केला. नंतर तो साहेब परत गेला. ती फौज कांहीं काळानें साजापुरावरून पुण्यास आली. व पुढें चंदेरीकडे लढण्यास चालली.

४ इकडे शिकरवारी इलाख्यांत घुरया बसई एथील ठाकुराचें, कांहीं फौज पाठवून पारिपत्य केलें. तसेच त्या इलाख्यांतील सुभा गोपाळ राव आबाजी याजबरोबर तेथील कांहीं फौज देऊन त्यास कोतवाल इलाख्यांत अजनोध्यास पाठाविलें. त्याणें तेथें थोडासा प्रतिबंध अनुभविल्यावर तो गांव जाळून टाकिला. नंतर हीच फौज व तिचे मदतीस आणखी तवरघार इलाख्यांतील कांहीं शिबंदी व तेथील त्यावेळचा मुख्य अधिकारी बाळाजी गणेश यांस, जमीपाळ याणें बराबर घेऊन, मागें अपनो एथील गढी गेली होती, ती परत घेण्याचें योजिलें. त्यावेळीं बाळाजी गणेश याणें तापाचें मिषकरून प्रथम तेथें जाण्याचें नाकारलें. परंतु गोपाळ राव आबाजी याणें ती सर्व फौज गढी जवळ नेली. तों ते बंडवाले पूर्वींच तीजागा सोडून पळाले होते.

५ यानंतर सोपूर एथील बंड बहुत बळावलें. सबब शिंद्यानीं आपल्या बरोबर मोठी फौज घेऊन शिकरवारी इलाख्यांत जोराआलापूर एथें तळ दिला. आणि तेथून मेजर बापूआवाड याचे हाताखालीं सुमारें अडीचहजार कवाइत शिकलेली, व शिवाय कांहीं बे कवाइती फौज देऊन त्याजबरोबर बासुदेव रामचंद्र ग्वाल्हेर प्रांताचा सरसुभा यास पाठविलें. ही फौज सोपुरास पोंचल्यावर प्रथम तिणें शत्रूवर तोफांचा मार चालविला आणि अग्नीचा वर्षाव केला.

[illegible] सुद्धांनीही त्यांचे शत्रूवर दुसऱ्या बाजूनें हल्ला केला. तेव्हां ते बंडवाले सर्व पळाले. शिंद्यांचे फौजेनें त्यांचा पाठलाग केला. त्यासमयीं तोफांचे मार व स्वारांचा हल्ला यांहीं करून शत्रूचे सुमारें अठराशें लोक मेले. तसेच आणखी कित्येक लोक, तेथें एक नदी आहे, तींतून पळून जातअसतां बुडून मेले. खेरीज सुमारें शंभर लोक कैदी केले. त्यांस पुढें जिवें मारिलें. राजाचा मुलगा होता तोही नदींत बुडून मेला, व राजा पळून गेला. तेव्हां त्याचें स्थान बडोद तेंही शिंद्यांनीं घेतलें. (परंतु पुढें स्वस्छता झाल्यावर इंग्रजांचे मध्यस्थी मुळें परत दिलें.)

६ ही लढाई होत असतां शिंदे स्वतां जोऱ्यास होते. त्यांणीं त्या इलाख्यांतील धार ठाकूर जे नेहेमी वसूल करण्यास व शांतता राखण्यास बहुत अडचण करीत असत, त्यांस एकाएकीं धरून ग्वाल्हेरच्या किल्ल्यावर कैदेंत ठेविलें. यानंतर ही फौज माघारी ग्वाल्हेरीस आली.

७ मग जयाजी माहाराज व दिवाण दिनकराव हे कांहीं मसलती करितां आग्ऱ्यास गेले होते. ते परत आल्यावर इंग्रजांनीं यांस च्यार तोफा पाठवून दिल्या.

८ याच सुमारास नाना पेशवा यांज कडून कोणी एक शास्त्री आला. त्याणें शिंद्यांचे, कांहीं पलटणी लोक इसागडास होते, त्यांणीं बंड करून नानास मिळावें असा बेत केला. तेव्हां ही गोष्ट त्यांतील हवालदारें याणें लागलीच तेथील सुभा गोविंदराव नारायण यास सांगितली. त्याणें त्याला युक्तीनें कैद करून, इंग्रजी फौज त्या समयीं झासी जवळ लढत होती तेथें पाठविलें; त्यांणीं शेवटीं त्या शास्त्रीबावास फांशीं दिलें.

९ याच संधीस राजा मानशिंग याणें नरवर इलाख्यांत बहुत उपद्रव मांडिला. याचे पराभवाकारितां वासुदेव रामचंद्र व टिकेराम कुमेदान यांजबरोबर एक पलटण व कांहीं स्वार देऊन पाठविलें. त्यांणीं सिप्री वरून जाऊन [illegible] हा गांव, मान सिंगाचे लोकांनीं घेतला होता त्यांस तेथून हाकून [illegible] घेतला. या पुढें चंदेरीस इंग्रजी फौज लढत होती, तिणें तो किल्ला [illegible] ही फौज [illegible] गेली. त्यासमयीं त्या किल्ल्याचे रक्षणास [illegible] [illegible] व टिकेराम कुमेदान यांस त्यांचे [illegible] पाठविलें.

१० या प्रमाणें शिंदे व त्यांचे मंत्री मोठ्या युक्तीनें आपले राज्यांत स्वस्थता राखीत असतां तारीख ३० मे सन १८५८ रोजीं कांहीं भयंकर वर्तमान आलें तो प्रकारः— झांशी एथील राणीस इंग्रजांनीं पळविलें. तेव्हां ती कालपी एथें बंडवाल्यांस जाऊन मिळाली. तेथें ती, तात्याटोप्या, पेशवा, आणि बांद्याचा नबाब यांच्या बंडखोर फौजेशीं इंग्रजांची लढाई झाल्यावर त्या सर्व बंडवाल्यांनीं ग्वालेरीकडे चाल केली. तेकाळीं, सिंधनामें नदी उतरून ता० १३ मे रोजीं मुरारचे पलीकडे तीन कोशांवर ते येऊन राहिले. व दुसऱ्या दिवशीं शिंद्याची राजधानी लुटण्याचा त्यांणीं बेत केला. त्यासमयीं महाराज याणीं आपल्या सर्व सरदारांस मसलती करितां बोलाविलें. दिनकरराव दिवाण यांचा शिंद्याचे फौजेशीं कांहीं संबंध नवता. ते मुलखी व इतर कामें पाहात असत. तात्या टोप्या याफौजेंत या बेद्याच्या पूर्वींच येऊन गेलाहोता. हीखबर जरी त्यावेळीं समजली नवती, तत्रापि शिंद्याचे खासगी कवाईत शिकलेले पुरभय्ये लोक बहुत होते, ते आपल्या लखनौ प्रांतांतील भाऊबंदांप्रमाणेंच, इंग्रजांचा।शिंद्यानें पक्ष धरिला, सबब त्याचे हिताकारितां कदापि लढणार नाहींत असें दिसून आलें होतें. तेव्हां लढाई नकरितां दुसरा कांहीं उपाय योजण्याची मसलत होतहोती; परंतु महाराजांचा आपल्या हाताखालच्या फौजेवर पूर्ण भरवसा होता, सबब ता० १ ली जून रोजीं मोठ्या प्रातः काळीं आपला बाडीगार्ड व आणखी पायदळ फौज घेऊन मुरारच्या पूर्वेस बंडवाल्यांस अडविण्याकारितां सर्व फौज लढण्याचे थाटानें उभी केली. तींत मध्यभागीं बाडीगार्ड यास टेवून शिंदे स्वत- तेथें राहिले. सूर्योदयानंतर शत्रु जमावानें येतात असें दिसलें. त्यांस शिंद्याची फौज तात्याटोप्यानें पूर्वींच फितवून टेविली आहे, हेंमाहीत होतें म्हणून तीच फौज यासमयीं दोहींबाजूस होती, यास्तव ती आपणासि उपद्रव करणार नाहीं असें जाणून जेथें शिंदे आपल्या बाडीगार्डचे स्वार व तोफखाना यासह स्वयं उभे राहिले होते, तेथेंच शत्रूनीं प्रथम हल्ला आणिला. त्यासमयीं बाडीगार्डाचे

१ हा येऊन गेल्यावर त्यास लष्करचे लोक व आणखी कांहीं लोक सामील झाले. हें माहित असतां बाहेर न केलें व असे आणखी कांहीं गुन्हे या वरून महाराज साहेब बाड्यांत आले तेच दिवशीं भोलाराम जमादार यास गोळी घालून ठार मारिलें व अमरचंद बाटे व दुसरा एक मराठा यास मागाहून कांहीं दिवसांनीं फाशीं दिली व दुसरे कित्येक लोक कैद झाले.

लोक चांगल्या प्रकारें लढले. त्यांत एक आपा शिंदा ह्मणून सरदार होता, तो ही पडला व बाडीगार्डा पैकीं सुमारें शंभर लोक जायां झाले. यासमयीं दोहीं बाजूंचे फौजेस शत्रूवर हल्ला करण्याचा हुकूम शिंद्यानें दिला असतां त्यांणीं मानापासून तो हुकूम न एकतां कांहीं वायबार मात्र काढिले. त्यावरून आपली फौज शत्रूस मिळाली असें जाणून शिंदे रणभूमी वरून परत फुलबागेंत येऊन आग्र्याकडे चालले. त्यांस दिनकररावही जाऊन मिळाला. पुढें ते दोघेही कोतवाल एथें जाऊन धोलपुरास गेले. तेथून ता०३री रोजीं थोडक्या लोकांसह आग्र्यास पोंहचले.

११ इकडे महाराज यांची लढण्याची तयारी झाली. हें ऐकून बहुत्येक सरदार सरकार वाड्यांत जमले होते. त्यांतून कांहीं महाराजांचे मागून आग्र्यास गेले. व बंडखोर लोकांनीं पुढें चालकरून फुलबागेंत आल्यावर तेथें आग लाविली. त्यावरून ते शहरांत येणार ह्मणून बायजाबाई व चिमणाराणी ह्या सरकार वाडा सोडून नरवराकडे चालत्या झाल्या. त्यांजबरोबर बाकीचे सरदार व मानकरी लोक गेले. यानंतर शिंद्यांचे दरबारी बहुत्येक लोक जे बंडखोरांस सामील झाले नवते ते कोणी नरवरास व कोणी आग्र्यात जाते झाले.

१२ बंडवाल्यांमध्यें मुख्य तात्या टोप्या, रावसाहेब—पेशव्यांचा पुतण्या, झांशीचीराणी, बांद्याचा नबाब, रामराव गोविंद व लक्ष्मणनाना यांणीं शिंद्यांच्या राजधनींत येऊन तेथील खजिना हस्तगत केला. व सर्व फौजेस तीन माहीं इनाम वाटलें. परंतु फारशी लूट न करितां बंडवाल्यांचा अंमल स्थापिला; बंदिवान सर्व सोडिले. याशिवाय महाराजांबरोबर गेलेले मुख्य सरदार दिनकरराव, बाबी माहूरकर व बळवंतराव जिनसीवाले यांच्या घरांवर जप्ती बसाविली. व याठिकाणीं आपलें कांहीं दिवस पर्यंत रक्षण होईल अशी अशा करून राहिले. किल्यावरही कांहींसा बंदोबस्त केला. आणि गंगेच्या दक्षिणेस बंडवाल्यांचें मुख्यस्थान ग्वाल्हेर झालें.

१३ महाराज आग्र्यास जातांच लागलेंच सरह्यूरोझ यांणें आपल्या फौजेनिशीं ग्वाल्हेर पर्यंत घेण्यास जावें असें ठरलें. त्याणें आपल्या बरोबरच्या फौजेचे दोन भाग करून एक भाग ब्रिगेडियर स्टुअर्ट व दुसरा सर आर०नेपियर

यांचे हाताखालीं दिले. व त्यांस बरोबर घेऊन तो ता० ६ जून रोजीं कालपीहून निघाला, तो नववे दिवशीं ग्वाल्हेरीजवळ सुपावलीस दाखल झाला. याप्रमाणेंच त्याणें सिप्रीहून स्मिथ साहेबाची फौज, तशीच झाशीकडून ओरसाहेबाचेंही लश्कर ग्वाल्हेरीकडे येऊन त्याणें स्मिथ याचे फौजेस रस्त्यांत मिळावे असा हुकूम दिला. त्याप्रमाणे त्या दोन्ही फौजा १५ व्या तारखेस अंत्री एथें येऊन एकत्र झाल्या. व सत्राव्या तारखेस कोठ्याचे सराईस येऊन त्यांनीं मुक्काम केला. यानंतर महाराज व दिकररावही मेजर मीड यांचे स्वार बरोबर घेऊन धोलपुरास आले. तेथें दोन दिवस राहून १८ व्या तारखेस रोज साहेबाच्या फौजेस मुरार मुक्कामीं येऊन मिळाले.

१४ जनरलरोज याणें प्रथम मुरारेवर हल्ला केला. आणि तेथील बंडवाल्यांस पळविलें, तेव्हां त्यांपैकीं बहुतेक लोक मुरार नदी पुलावरून उतरले. त्यांचा इंग्रजी फौजेनें पाठलाग केला, तेव्हां किल्ला व नदी यांमधील मैदानांत मोठी लढाई झाली. व तेथें एक लहान वेढ आहे त्यांत बंडवाले शिरले. त्यांस हाकून काढत्येवेळीं हायलांडरचे ७१ व पलटणींतील लेफटीनंट नेव्ह हा पडला. ही लढाई शिंद्यांच्या फितूर झालेल्या फौजेपैकीं बाडीगार्डच्या पायदळ पलटणीनें केली.

१५ ब्रिगेडीयर स्मिथ १७ व्या तारखेस कोट्याचे सराईस आला. तेव्हां शहराच्या दक्षिणच्या टेकड्यांचे पायथ्याशीं बंडवाल्यांचा जमाव त्याचे दृष्टीस पडला व त्यास शहरांत पोंचण्यास या टेकड्या ओलांडणें भाग होतें. सबब त्याणें १० व्या व ९५ व्या पलटणच्या दोन कंपन्या, हुजारपैकीं २०० स्वार हे नदीचे अलीकडे आणिले. तेथें कांहीं लढाई झाल्यानंतर आणखी इंग्रजी स्वार अलीकडे आले. त्यांजवर बंडवाल्यांनीं आपल्या तोफांचा भडिमार केला. त्यासमयीं मोठें युद्ध झालें. नंतर ती फौज, तेथें त्या नदीच्या फुलबागेकडे नहर नेलेला आहे, त्याचे आश्रयानें फुलबागेकडे चालली. यासमयीं जें युद्ध झालें, त्यांत झाशीची राणी पडली. तिला लागलीच तिच्या लोकांनीं जाळिली. याप्रमाणें १८ व्या तारखेस लढाई झाल्यावर सेर ह्यू रोझ व ब्रिगेडियर स्मिथ यांच्या

१ उन्हाळ्यांत उन्हाळ्यांत पाणी नसतें.

फौजा एकत्र झाल्या. १९ साव्या तारखेस शहराजवळच्या दक्षिणच्या बाजूच्या टेकड्यांवर बंडवाले होते, त्यांशीं लढण्या करितां चार तोफा नहराच्या आलीकडे उतरल्या. तेव्हां शत्रु पळाले. त्यांचा सर ह्यू रोझ याच्या स्वारांनीं पाठलाग करून बहुत लोक मारले. नंतर रात्रीं शहर व सरकारवाडा हस्तगत झाला. पुढें किल्यावर मात्र कांहीं बंडवाले राहिलेहोते ह्मणून लेफटिनेंट रोझ यानामें करून कोणी मुंबईच्या २५ व्या नेटिव पायदळ पलटणींतील साहेब होता, त्यास खुद ग्वाल्हेरचे कोतवालीचे कामास पाठविलें. त्याजवर किल्यांतील लोकांनीं तोफांचे गोळे सोडले. त्यासमयीं तो व दुसरा एक साहेब लेफटिनेंट वालर ह्मणून होता, त्यांणीं आपणाजवळील थोडक्या लोकांनिशीं किल्ला घेतल्यास आपला पराक्रम बहुत दिसून येईल, या आशनें एका लोहारास बरोबर घेऊन किल्यांत जाण्याचे वाटेवरील एका मागून एक सर्व दरवाजे फोडले, आणि वर गेले. तेथें बंडवाल्यांनीं भिडून लढाई केली. एका बारेलीच्या मुसलमानानें रोझ साहेबास मागून गोळी मारली; ती पाठीच्या कण्यांतून पुढें पार गेली. तो पडतांच त्या गोळी मारणारानें येऊन त्याचे हातपाय तोडले. तेंव्हां त्याचा सोबती वालर याणें पुढें होऊन त्यामारणारास ठार मारिलें आणि किल्ला घेतला. रोझ साहेब पडल्या जागेवरच मेला.

१६. ता० २० जून रोजीं शिंदे महाराजांस मोठ्या समारंभानें गादीवर बसवून राज्याचा सर्व अधिकार त्यांचे हवालीं केला. यासमारंभाचे सन्मानार्थ हिंदुस्थानांतील सर्व मुख्य जागीं तोफांची सलामी होण्याचा गवनर जनरल यांणीं हुकूम दिला.

१७ ग्वाल्हेर घेतल्यावर बंडवाले पळाले होते, त्यांचा पाठलाग करण्याकरितां सर राबर्ट नेपियर याजबरोबर कांहीं फौज देऊन पाठविलें. त्याची व बंडवाल्यांची जोराआलापूर मुक्कामीं गाठपडून तेथें एक मोठी लढाई झाली. तींत याणें त्यांपासून सर्व तोफा व हत्ती घेतले. नंतर बंडवाले चंबळानदी उतरून सरमथरा वरून जयपुराकडे गेले व नेपियर साहेबही परत लष्करांत आले.

१८ आग्र्याहून धोलपुरास आलेल्या फौजेचा एक भाग चंबळानदी उतरू-

न जोरा आलापूरपर्यंत गेलाहोता, परंतु याचें विशेष कांहीं काम पडलेंनाहीं.

१९ त्यानंतर सर ह्यू रोझ मुंबईकडे चालता झाला व कांहीं दिवस ग्वाल्हेरच्या राज्यांत स्वस्थता राहिली. परंतु पुढें आगष्ट महिन्यांत पाडोणचा राजा मानशिंग याणें बंडकरून पोहचरीचा किल्ला घेतला. त्याच्या पराभवाकरितां ब्रिगेडीयर स्मिथ, त्यासमयीं सिप्रीस होता, तो गेला. परंतु तेथें मानशिंगाचे लोकांचा जमाव मोठा होता सबब त्याणें ग्वाल्हेरीहून मोठ्या तोफांच कुमक मागीतली. त्यावरून सर राबर्ट नेपियर, त्यासमयीं ग्वाल्हेरीस होता, त्याणें आपणाबरोबर फौज व मोठ्या तोफा घेऊन १९ वी आगष्टरोजीं पोहरीस स्मिथ साहेबाचे फौजेस जाऊन मिळाला. आणि २३ व्या तारखेस पोहरीच्या किल्यांत अग्नीचा वर्षाव करून नंतर तट फोडण्यास आरंभ केला. परंतु शत्रु त्याचरात्रीं ती जागा सोडून पळाले आणि इंग्रज आपला पाठलाग करितील याभयानें आपल्या फौजेच्या तीन टोळ्या करून निरनिराळ्या वाटांनीं जाऊन पुढें एकत्र होण्याचें ठरविलें. त्यानंतर पोहचरी हस्तगत करून नेपियर साहेब परत ग्वाल्हेरीस आले.

२० असें वर्तमान चाललें असतां तात्या टोप्या चंबळानदी उतरून पूर्वोउत्तरेस गेलाहोता तो रजपुतनांतून उदेपूर व नाथद्वारपर्यंत जाऊनपुनः इंग्रज लोक पाठलागकरीत असतां चंबळा नदी उतरला; आणि झालरापटणास येऊन तेंशहर लुटलें. त्यास अडाविण्याकरितां इंदूर व महू येथून फौज पाठविली. तींत मिचल साहेब मुख्यहोता. त्याची व तात्या टोप्याची बावऱ्याजवळ गांठपडली; तेव्हां तात्या टोप्या आपल्या सर्व तोफा मागेंटाकून खजिन्याचे हत्ती घेऊन पळाला. तेव्हां त्याच्या मागें इंग्रजांच्या फोजेचे सहा भाग निरनिराळ्या दिशां कडून लागले असतां तो सिरोंजेवरून शिंद्याचे मुलुखांत शिरला, तो इसागडास आला. तेथील सुभा गोविंदराव नारायण याणें ती जागा रक्षणकरण्याचा प्रयत्न केला. परंतु तात्या टोप्याबरोबर फौज बहुत असल्यामुळें तो व्यर्थ जाऊन तो साहेब तेथून गुप्तपणें निघून इंग्रजी फौज येतहोती, तिजमध्यें जाऊन मिळाला. इंग्रजीफौज संनिध आल्याचें एकून बंडवाले इसागडाहून पळाले, ते चंदेरी जवळ आले; याठिकाणचे किल्याच्या रक्षणास वासुदेव

रामचंद्र ग्वाल्हेरचा सरसुभा व टिकेराम कुमेदान यांस थोडक्या फौजेनिशीं ठेविलें होतें. तो किल्ला घेण्याकरितां बंडवाल्यांनीं हल्लाकेला. परंतु त्यांनीं आंतून लढून बंडवाल्यांचा कांहीं नाशकेला. इतक्यांत इंग्रजी फौज जवळ आल्याची वातमी आली. यामुळें ते बंडखोर तें स्थान सोडून लवकरच दक्षिणेकडे चालते झाले. हे बंडवाले जिकडून गेले त्याप्रदेशांत जणूकाय वणवा लागत गेल्या प्रमाणें देश ओसाड पडला.

२१ नंतर तात्या टोप्या व रावपेशवा दक्षिणेकडे जातां जातां नर्मदा उतरले. ते इंग्रजी फौज पाठलाग करीत असतां सिंदव्याच्या घाटापर्यंत जाऊन तेथून पश्चिमेकडे वळून गुजराथेवरून पुनः मध्य हिंदुस्थानांत शिरले; त्यांस मानशिंगाचे कांहीं लोक पूर्वींच मिळालेहोते, व यासमयीं मानशिंगही त्यांसच सामील झाला. आणि शिरोंज व दुसऱ्या ठिकाणचे जंगलांत राहून मध्य हिंदुस्थानांतील लोकांस ते उपद्रव देतच होते. याशिवाय फिरोझ शहा अयोध्येंतून पळाला होता, तो सुमार दोन हजार लोकांनिशीं ता० ६ वी डिसेंबर रोजीं चंबळानदी उतरून ग्वाल्हेरीपासून सात कोशांचे अंतरानें मध्यहिंदुस्थानांत गेला; व हाही तेथील बंडवाल्यांस मिळाला. याचा जनरल नेपीयर साहेबानें ग्वाल्हेरीहून पाठलाग करून इसागडाजवळ त्याला गाठून १८ व्या तारखेस लढाई केली; परंतु फिरोज शहा आपल्या बहुत्येक लोकांनिशीं पुढे पळून गेला.

२२ यापूर्वीं इंग्लंडचे राणीसरकारचा जाहीरनामा ता० १ ली नवंबर सन १८५८ त प्रसिद्ध झाला. त्यामुळें जे हलक्या अपराधाचे बंडखोर होते ते इंग्रजांस येऊन मिळाले व बांद्याचा नबबही इंदूर मुक्कामीं शरण येऊन बंडवाल्यांचा जमाव अगदीं कमतीहोत चालला. तेव्हां मानशिंगही मिळाला आणि आपली पुर्वींची संस्था शिंद्याकडून देववावी म्हणून, त्याचा जिवलग सोबती जो तात्याटोप्या त्याजकडे आला होता, त्यास विश्वासघातानें धरून इंग्रजांचे हवालीं केला. मग त्याला इंग्रजांनीं सिप्रीमुक्कामीं फाशीं दिलें.

२३ यानंतर लार्डक्यानिंग हिंदुस्थानचे गवरनरजनरल हे सन १८५९ सालीं हिंदुस्थानांत फिरावयास निघाले. त्याणीं त्याच वर्षाच्या नवंबर महिन्यांत

आग्रा एथें आसपासचे राजेरजवाडे यांचे मोठें दरबार भरलें. त्यासमयीं महाराज जयाजीराव शिंदे व दिनकरराव रघुनाथ दिवाण यांणीं इंग्रज सरकारास चांगली मदत दिल्याविषयींची स्तुति करून महाराजांस तीन लक्षांचा नवीन मुलूख व दिनकररावास पांचहजारांचे गाव इनाम दिले. [1]याशिवाय बाबा माहूरकर व बळवंतराव माधव यांस दोनदोन हजारांचे गाव इनाम दिले. याशिवाय किरकोळही कांहीं इनामें दिलीं. व मागें माळवा प्रांतीं शिंद्यांच्या राज्यांतील आमझरा पयील राजानें बंड केलें, त्यास इंदूरमुक्कामीं फांशीं दिलें. त्याचा सुमारें दोन लक्षांचा मुलूख होता, तोही शिंद्यांच्या स्वाधीन करून त्यापैकीं यांणीं आपल्या सरदारांस जाहागिरी वांटून द्याव्या असें ठरलें होतें.

---

१ याशिवाय मागील येण्याची मुक्तता वगैरे बरींचफायद्याचीं कलमें झालीं.

**समाप्त.**